# रा जा रा णी

भालचंद्र विठ्ठल नाडकर्णी

१९५१

एकमेव विक्रेते

श्री समर्थ बुक डेपो, गिरगांव, मुंबई ४

मूल्य दोन रुपये



राजाराणी

धूम्रमय जगत्

तुकारामाचं वेड

शामू

गुलाबी कोडं

प्रेम आणि आगगाडी



## राजाराणी

निर्मलेच्या तोंडची ती बातमी ऐकून, बन्याबापू आरामखुर्चीत ऐसपैस रेलून बसला होता तो ताडकन् उठून बसता झाला आणि डोळ्यांना खूब ताण देऊन न् पटकन् एक आवंढा गिळून तो ओरडला,

" काय म्हणालीस ? ठकुआत्या ?—"

" होय, होय, ठकुआत्याच म्हणालें मीं ! "

" म्हणजे–म्हणजे–तुझी ती–ती ठकुआत्या ? "

" होय, होय, होय !—माझीच—आमचीच ठकुआत्या ! जिला तुम्ही माई म्हणत होता तीच !"

जगबुडती आल्यासारखा हताश चेहरा करून बन्याबापूनं एकदां आजूबाजूला पाहिलं अन् मग एकदम पुन्हां तो म्हणाला,

" न् ही ठकुआत्या—म्हणजे आपली माई इथं आपल्याकडे येणार आहे असंच म्हणालीस का तूं ? "

" आता काय सांगावं बाई !" निर्मला डोळे उडवीत म्हणाली, " ठकुआत्याचं नाव काढतांच अगदीं ऐकूं येईनासं झालं, कीं, क्षणापूर्वी ऐकलेल्या गोष्टीचं विस्मरण पडायला लागलं ! आता पुन्हां सांगतें, ऐका, नीट ऐका हं कान देऊन ! " अन् त्याच्या कानाकडे तोंड नेऊन कर्णा फुंकावा तसा आवाज काढून ती उद्गारली,

" आमची ठकुआत्या इथं येणार आहे उद्यां...ऐकूं आलं आतां नीट ? "

कानावर पटकन् हात घेऊन बन्याबापू किंचाळला, " हो हो हो–आलं ऐकूं ! तुझ्या ठकुआत्याच्या आगमनाची इतक्या दणक्यानं नको कांहीं जाहिरात करायला ! "

" मग तुमच्या कानालच शिरलं नव्हतं ना अजून ? "

" शिरलं ! शिरलं ! " बन्याबापू कान चुकवीत घाईघाईनं म्हणाला, " कानच काय, पण अंतःकरण मेंदु सारं काहा भेदून आत गेलय् तं !—पण—पण तूं मला सांग, ठकुआत्या याच वेळीं येतय कशाला इथं ? "

" कशाला म्हणजे ! हे काय बाई विचारणं ! माझ्या माणसानीं येऊंच नये का कधीं तुमच्याकडे ? "

" तस नव्हे ग ! पण अशी मध्येंचशी आठवण झाली आमची तिला एकदम ? इतक्या दिवसात कधी पत्र सुद्धा नव्हत ! "

त्याच्या तोंडापुढं येऊन माना हालवीत अन् डोळे उडवीत निर्मला उद्गारली, " राजाराणीचा संसार थाटलात ना ? ते तुमचं राज्य कसं चालवताहा हें पाहण्यासाटीं येतय् ती ! राणीला डोक्यावर बसवून ठेवलीत, की वहाणाकडे उभी केलीत हें पाहणार आहे ती ! कळलं का ? "

इतकं म्हणून ती वेणीच्या शेपट्याची गाठ हातावर मारीत जोरजोरानं खिदखिदू लागली.

बन्याबापूला तिच्या खिदखिदण्याचा संसर्ग बाधला नाहीं. उलट तो अधिकच केविलवाणी मुद्रा करून म्हणाला,

" निमा, तूं बोलावलस वाटतं ठकुआत्याला ? "

" मी !— नाहीं ग बाई ! ठकुआत्याच्या त्या कडक शिस्तींत मी चांगली निघालेय् पोळून, ती मी तिला इथ मुद्दाम बोलावून घेईन ? "

" खरच नाहीं तूं बोलावून घेतलंस तिला ? "

" म्हणजे तुम्हांला शंका येतय् ? खरं नाहीं वाटत मीं सांगतेंय तें ! "

" हं ! " बन्याबापू नुस्ताच हुंकारला. त्याच्या डोळ्यांपुढं कालचा तो प्रसंग उभा राहिला.

तसं म्हटलं तर तो प्रसंग मोठासा लक्षांत राहण्यासारखा नव्हता. एरवींच्या

परिस्थितींत नी वेगळ्या एकाद्या कारणावरून तो उद्भवला असता, तर बन्याबापूनं तो मनांतून केव्हांच उडवून लावला असता. पण लग्न झाल्यानंतर आज प्रथमच हा मतभेदाचा प्रसंग त्या 'राजाराणी'मध्यें उद्भवला होता. गेल्या आठ महिन्यांत, हरेक गोष्टींत त्यानं त्या गोड पोरीच्या म्हण-ण्याला चटकन् मान तुकाविली होती न्, तिनंही "आज्ञा सरकार" असं तिरक्या मानेनं हंसत म्हणून प्रत्येक गोष्टींत त्याची आज्ञा शिरसामान्य केली होती. पण कालच्या त्या प्रसगानं या क्रमांत प्रथमच खंड पाडला होता. ज्या कारणानं हा मतभेद उद्भवला होता, तं कारणही इतरांना क्षुल्लकच वाटलं असत. खोलीच्या सजावटींत एकादी फुलदाणी कुठं मांडावी यावर कांहीं मोठासा वाद माजायला नको! बन्याबापूनं तर इतक्या क्षुल्लक गोष्टीवर आपल्या त्या लिवलग पोरीचं मन एरवीं कधीच मोडलं नसतं. पण त्याच्या दृष्टीनं अन् तिच्या दृष्टीनंही ती फुलदाणी क्षुल्लक या सदरांत बसूं शकत नव्हती. अन् इथंच घोड पेंड स्रात होत!

ती चिनीमातीची फुलदाणी ठकूआत्यांनी त्यांना त्यांच्या लग्नांत अहेर-दाखल दिली होती. इतके दिवस ती कोपऱ्यांतल्या छोट्या उंच मेजावर ठेवलेली होती अन् तिच्या पुढ्यात बन्याबापूनं आपला रुबाबांत काढून घेतलेला फोटो प्लास्टिकच्या भल्या मोठ्या चौकटींत बसवून मांडला होता. त्या चौकटीच्या मागं ती फुलदाणी लपली गेल्यामुळं आल्यागेल्या पाहुण्याच्या डोळ्यांत ती सहसा भरत नसे. बाबा आदमच्या काळची ती शोभा बन्याबापूच्या त्या अद्ययावत् आधुनिक फर्निचरमध्यें अगदींच विसंगत दिसत असे, अन् म्हणूनच त्या फुलदाणीला बन्याबापूनं अशी छपवून ठेवायची कारवाई केली होती हे तर खरंच, पण शिवाय त्या फुलदाणीसंबंधींच्या त्याच्या जुन्या आठवणी फारशा गोड नसल्यामुळं त्याला ती दृष्टीसमोरही नकोशी झाली होती. ठकूआत्यांच्या शेजारीं त्याच्या वडिलाचं बिऱ्हाड होतं, त्या वेळी एकदां, या फुलदाणीवर चितारलेल्या चिन्याची त्यानं कांहीं कुरापत काढल्यामुळं ठकूआत्यांनीं त्याला शिस्तीचा धडा म्हणून सडकून दम दिला होता. त्या अपमानाची

अढी त्याच्या मनांत कायमची बसून गेली होती. शिवाय एक दोनदां असेही कांहीं प्रसंग घडले होते, कीं त्यामुळं त्या फुलदाणीवरील त्या ' चिन्या' चं दर्शन त्याला अपशकुनीच वाटूं लागलं होतं. अन् यामुळं त्या फुलदाणीबद्दल, विशेषतः तिच्यावरील वेलपत्तीमधील दांत विचकणाऱ्या त्या ' चिन्या ' बद्दल तर त्याला अतिशयच तिटकारा वाटूं लागला होता.

पण ठकुआत्यांनीं आपल्या लाडक्या भाचीला आवडीनं दिलेली ती फुलदाणी घराबाहेर काढून लावणंही त्याला शक्य नव्हतं. तसा खडा टाकून पाहण्याच्या हेतूनं एके दिवशीं सहज म्हणून त्यानं निर्मलेला म्हटलं होतं, " निमू, इथं घरांत ही सुंदर प्राचीन वस्तु ठेवण्यापेक्षां आपण ती आपल्या त्या लिमयांच्या शाळेच्या वस्तुसंग्रहालयाला देऊन टाकली तर ! तिथं प्राचीन शिल्पाचा एक नमुना म्हणून त्यांना उपयोगी पडेल अन् देणगीदार म्हणून आपलंही नांव—"

पण त्याचं वाक्य पुरं होऊं न देतांच निर्मला मध्येंच तोंडाचा चंबू करून म्हणाली होती, " वाऽ ग बाई ! लग्नांतला आहेर कुणी दुसऱ्याला देणगी म्हणून देऊन टाकतं का ? अन् त्यांत तो आहेर दिला आहे ठकुआत्यानं !–तिच्या आवडीची वस्तु तिनं एवढ्या प्रेमानं दिली, ती अशी देऊन टाकायला का ? नकोऽऽग बाई ! "

बन्याबापू त्या वेळीं निरुत्तर झाला होता. त्यानं त्या फुलदाणीकडे पाहून, किंवा त्याच्याच शब्दांत सांगायचं म्हणजे त्या बदमाश चिन्याकडे पाहून स्वगत दोनतीनदां दांतओठ खाल्ले होते; एवढंच काय, पण त्याला तसाच उचलून खिडकीबाहेर भिरकावून देण्यासाठीं त्याचे हात शिवशिवूंही लागले होते. पण केवळ त्या पोरीकडे पाहून त्या हातांना त्या वेळीं त्यानं सबुरीचा सल्ला दिला होता. तथापि कशा रीतीनं ही घरांत शिरलेली ' चिनी यादवी ' नष्ट करावी याबद्दलचे त्याचे विचार थांबले नव्हते.

आणि यामुळंच, काल संध्याकाळीं ऑफिसांतून तो घरीं आला, त्या वेळीं, त्या ' चिनी यादवी'नं आपल्या फोटोमागची ती छुपी जागा सोडून, खोलीच्या मध्येंच मांडलेल्या नव्या चकचकीत पॉलिशच्या सुबक मेजावर अकस्मात

ठाण मांडलेलं दिसतांच त्याच्या डोळ्यांची विलक्षणच ओढाताण झाली, अन् तिला तेथून उचलून फेकून देण्यासाठीं त्याच्या हातांनीं चाळाही केला. पण तितक्यांतच त्याची नजर तिथं त्याच क्षणीं आलेल्या निर्मलेवर गेली आणि मग आपले हात पँटच्या खिशांत कोंबून न् फुलदाणीवर आपली नजर रोखून तो उद्गारला, " इथं कुणी ठेवली ही ? "

" काय ठेवली ? "

" ही–ही सुरई ! "

" सुरई नव्हे. फुलराणी आहे ती ! "

" फुलराणी ? " अधिकच डोळे वटारून त्या फुलदाणीकडे पाहत बन्याबापू गुरगुरला.

" हं —मीं तिला फुलराणी असं नांव ठेवलंय् आजपासून !—त्या घोटणेकर बाई तसंच म्हणत होत्या ! " निर्मलेनं वेणीला झोले देत प्रेमभरानं त्या फुलदाणीकडे पाहत म्हटलं.

" कोण घाटणेकर ही ? "

" घाटणेकर नव्हे घोटणेकर ! " निर्मला उत्तरली, " आमच्या महिला समाजाच्या सेक्रेटरी !—त्या आल्या होत्या इथं दुपारीं !—त्या म्हणाल्या, इतकी सुंदर फुलदाणी दडवून कां ठेवलीत त्या फ्रेममागं ? दर्शनी मांडा कीं कुठंतरी !—"

" तिला हवी ती फुलदाणी ?—" आशाभरित स्वरांत बन्याबापूनं एकदम विचारलं.

" तिला नकोय !—न् हवी असली तरी मीं तिला देणार नाहीं ! " निर्मला ठांसून म्हणाली.

" नको देऊं ! पण तें सुरई पात्र तिथं मध्यभागीं नको—आल्यागेल्यांचे डोळे फोडायला ! "

" डोळे फोडायला ? " निर्मलेनं पटकन् डोळे विस्फारले.

" हो ना–त्याकडे पाहणं म्हणजे डोळ्यांवर शुद्ध अत्याचार करणं होय ! " बन्याबापू आवेशानं म्हणाला.

निर्मलेनं त्यावर नाक उडवीत चटकन् म्हटलं,

" म्हणतात ना—गुळाची चव काय ? "

" काय म्हणालीस ? " बन्याबापू टाय खुंटीवर ठेवण्यासाठीं मागं वळला होता, तो एकदम ' घुमजाव ' करून म्हणाला, " गुळाची चव !—"

" नाहीं तर काय ! केवढ्या मोलाची ती फुलदाणी आहे, ठाऊक आहे ? तिची कारागिरी किती अप्रतिम आहे ! एखाद्या ' क्युरिओज ' जमविणाऱ्या शेठियाला विकली तर सहज हजार दोन हजार येतील कीं ! "

" मग टाकूंया ना विकून ! "

" छट् ! आहेराची वस्तु !—आत्याला कळलं तर ती काय म्हणेल ? "

" कांहीं म्हणणार नाहीं ! "

" उगाच नका वेड पांघरूं ! आत्या इथं असती तर ती फुलदाणी तिनं इथंच मध्यभागीं दर्शनी ठेवली असती ! आपल्या डोळ्यापुढं सतत राहावी असा तिचा कटाक्ष असे ! "

" तिचा कटाक्ष तिच्या घरीं ! अन् ती आज कांहीं इथं नाहीं आलेली ! "

" न् समजा ती आली इथं-" निर्मलेनं एकदम प्रश्न केला, " न् ही तिची आवडती फुलदाणी तिथं त्या जंगी फ्रेममागं दडवून ठेवलेली दिसली तिला, तर तिला काय वाटेल ? "

" अशी जर तरची भाषा काढण्यांत अर्थ नाहीं ! " बन्याबापू किंचित् कडवट स्वरांत म्हणाला, " ती आली तर काय करायचं हें मग पाहूं ! तूर्त ती पूर्वीच्या जागी ठेव पाहूं ! "

" न् नाहीं ठेवली तर !--" निर्मलेनं तितक्याच ठसक्यानं विचारलं.

" अं ! " तिच्या प्रतिप्रश्नानं चमकून बन्याबापू उद्गारला, " नाहीं ठेवली तर !—नाहीं ठेवली तर—मग ठेव कुठं तरी ! "

अन् इतकेच उद्गार काढून तो पुढं कांहीं न बोलतां तोंड धुण्यासाठीं आंत गेला. परत येऊन पाहतो, तों ती फुलदाणी मधल्या छोट्या मेजावरून उठून, ड्रेसिंग टेबलावर विराजमान झालेली त्याला दिसली.

" तिथं तरी ठेवायला हरकत नाहीं ना ?" निर्मलेनं प्रश्न केला, त्यावर त्यानं नुस्ता हुंकार देऊन त्या प्रकरणावर तात्पुरता पडदा ओढला होता.

पण त्यामुळं त्याच्या मनांत त्या प्रकरणानं उसळविलेलं वादळ काहीं शांत झालं नव्हतं. उलट आपल्या त्या राजाराणीच्या चिमुकल्या राज्यांत हा छोटा पेंचप्रसंग निर्माण करायला कारणीभूत झालेल्या त्या फुलदाणीविषयीं त्याला आतां शतपटीनं—नव्हे सहस्रपटीनं तिरस्कार वाटूं लागला होता. ही ' चिनी यादवी ' घरात अशीच राहू दिली तर कलहाचे प्रसंग आणखीही वरचेवर निर्माण व्हायचे न् नसतं वितुष्ट माजून राहायचं, असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले होते आणि कांही तरी क्लृप्ति योजून ही बला घरांतून काढून लावायचीच असा त्यानं आतां मनाशी निश्चयच करून टाकला होता. ही क्लृप्ति काय योजायची याबद्दलचाच विचार तो आतां करीत बसला होता, तोंच सुरुवातीला सांगितलेली ती ठकुआत्यांच्या आगमनासंबंधींची बातमी त्याच्या कानावर एखाद्या स्फोटक बॉम्बप्रमाणं आदळली होती !

त्यानं हताश चेहऱ्यानं पुन्हां आसपास पाहिलं. आदल्या दिवसापासून ड्रेसिंग टेबलावर चढून बसलेल्या त्या फुलदाणीवरचा तो काफर चिनी दांत विचकून आपल्याला वेडावीत असल्याचा भास त्याला झाला. "आतां टाक कीं मला घराबाहेर काढून कसं तें" असंच जणूं तो वेडावून आपल्याला आव्हान देत आहे असं त्याला दिसलं. अन् त्यासरशीं, समोर उभ्या असलेल्या निर्मलेला त्यानं पुन्हा अगतिक स्वरांत विचारलं,

" निमा, ठकुआत्याला खरोखरचं नाहीं बोलावलंस तूं ? "

" छ बाई ?—नाहीच का पटत अजून ? आत्याचं पत्रच दाखवूं का ? —म्हणजे तरी पटेल का समजूत !"

इतकंच म्हणून निर्मलेनं टेबलाचा खण उघडला न् त्यांतील एक लखोटा काढून बन्याबापूच्या तोंडासमोर नाचवीत ती म्हणाली,

" वाचा हें ! का वाचून दाखवूं मी ! ऐका—वाचतें !—' चि. निमू हीस अनेक आशीर्वाद उपर. तुझें लग्न झाल्यापासून तुझी भेट झाली नाहीं, त्यामुळें तुला केव्हां एकदां पाहीनसें मला झालें आहे. तुमचा राजाराणीचा संसार

पाहून डोळ्यांचें पारणें फेडण्यासाठीं मीं तिथें मुंबईला येत आहे. परवां सकाळच्या गाडीनें निघून दुपारीं तिथें येईन ! तूं मला नेण्यासाठीं स्टेशन-वर येशीलच ! अधिक गप्पागोष्टी भेटीअंतीं—तुझी ठकुआत्या. ”

“ परवां—परवां ? म्हणजे उद्यांच नव्हे का ? ” बन्याबापूनं तोंड उघडलं.

“ हो उद्यांच !—पण इतकी काय त्याची चिंता करायला हवी ?—ठकु-आत्याची शिस्त कडक तर खरीच—पण प्रेमळही तशीच आहे ती ! ”

“ प्रेमळ ! ”—बन्याबापू कांहींसा उपहासपूर्वक उद्गारला.

निर्मला डोळे उडवीत म्हणाली,

“ होनं ! तुमच्यापेक्षांही तिचा स्वभाव मला अधिक ठाऊक आहे ! काढलीं आहेत मीं दोन वर्षं तिच्या हाताखालीं, पुण्याला शिकायला होतें त्या वेळीं ! जराशी विचित्र आहे खरी, पण तिची शिस्त न् मोठेपणा सांभा-ळला, कीं तिच्यासारखं माणूस नाहीं मिळायचं ! उगाच नाहीं लोक तिला मान देत आहेत ते ! ”

“ न् मागून कुचेष्टाही करीत आहेत ! ” बन्याबापू हळूच पुटपुटला.

“ तो लोकाचा स्वभावच आहे ! तिचा नवरा गेल्यानंतर सासरीं भांडीं घांशीत न राहतां नर्सिंगचं शिक्षण घेऊन स्वतःच्या पायावर ती उभी राहिली न् पैसाही पुष्कळ जमवला तिनं, हें कांहीं लोकांना आवडलं नाहीं. जुने दिवस होते ते-त्यामुळं त्या जुन्या लोकांनीं नांवं ठेवलीं तिला ! लोकांचीं तोंड कोण धरणार ? ”

यावर बन्याबापू नुस्ताच हुंकारला. ठकुआत्यांच्या स्वभावाबद्दल अधिक वाद घालण्यानं तो कांहीं आतां बदलणं शक्य नाहीं असा सुज्ञ विचार करून अन् आलिया भोगासी असावें सादर ही तुकोबारायांची धीर देणारी उक्ति आठवून त्यांच्याच सांगण्याप्रमाणं देवावरच आपला आतां सारा भार घालण्याचं त्यानं ठरविलं.

थोड्या वेळानं तो पाय मोकळे करून येण्याकरितां म्हणून बाहेर पडला, त्या वेळींही देवावर त्यानं टाकलेला हा भार किंचितही कमी झाला नव्हता.

पण मग देवाला तो भार असह्य झाल्यामुळं म्हणा किंवा बन्यासारख्या भक्ताचा अधिक अंत पाहणं त्याला इष्ट न वाटल्यामुळं म्हणा, देवानं असा कांहीं प्रसंग त्याच्या वाटेंतच घडवून आणला, कीं बन्याबापूची त्या क्षणापर्यंत सुकून गेलेली कळी एकदम उमलून हंसूंखेळूं लागली.

कुत्र्याचं पिल्लू मोठं गोजिरवाणं दिसतं. त्याला आंजारण्या–गोंजारण्याचाही मोह पुष्कळांना पडल्यावाचून राहत नाहीं. तथापि त्यानं कुणाला कांहीं नव्या कल्पनेची स्फूर्ति दिली असेल अशी उदाहरणं क्वचित्च घडलीं असतील. पण वाटेंत भेटलेल्या आपल्या त्या दोस्तामागून चाललेलं तें श्वानशावक पाहून बन्याबापूच्या डोक्यांत सर्कन् एका नव्या कल्पनेची चमक उठली. त्याच्या डोळ्यांपुढं, त्याची ती, म्हटलं तर दिवाणखाना, म्हटलं तर बेडरूम अशा थाटांत सजवलेली खोली नी त्यांतील तें ड्रेसिंग टेबल पटकन् उभं राहिलं. अन् मग आपल्या त्या दोस्तामागून चाललेल्या त्या अल्लड छाव्यानं त्या ड्रेसिंगटेबलावर पटकन् उडी घेतली आहे अन् त्यावर ठाण मांडून बसलेल्या त्या 'चिन्या'ची दाणादाण उडवून त्याला त्यानं सारंपुरं जमीनदोस्त केलं आहे !–त्या चिन्याच्या अगदीं ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या आहेत—

बन्याबापूला......तें दृश्य मोठं विलोभनीय अन् मोहक वाटलं !......

त्यानं त्या दोस्ताला एकदम म्हटलं, "वश्या, अगदीं कसा वेळेवर भेटलास अं ! खरंच ! दोस्त असावा तर असा !"

"कां ? काय झालं ?" शंकाकुल नजरेनं बन्याला आपादमस्तक न्याहाळीत वश्यानं प्रश्न केला.

"नाहीं, तसं कांहीं विशेष नाहीं !" ताबडतोब मुद्द्यावर येत बन्याबापू उत्तरला, "पण हा छोकरा कुठून पैदा केलास ?"

"छोकरा ?"

"हा रे !–हा बच्चा ! मस्त दिसतं आहे पोर !–" त्या श्वानशावकाच्या अंगावरून मोठ्या ममताळूपणानं हात फिरवीत बन्याबापूनं उद्गार काढले.

"हा बच्चा होय ? आमच्या वाडींतल्या त्या डॉक्टरसाहेबांनीं दिला

आम्हांला हा ! आहे मस्तवालच ! डॉक्टरांच्या टेबलावरचा स्टेथॅास्कोप या स्वारीनं चावून टाकला म्हणून त्यांचा घुस्सा झाला याच्यावर, अन् ट्रेनिंगसाठीं आमच्याकडे लावून दिला याला !--थोडासा उपद्व्यापी स्वभाव सोडला, तर बाळ फार गुणी आहे हो ! "

" छान ! आपल्याला हवा आहे असाच एखादा छोकरा !--" ' बच्चा 'च्या त्या गुणवर्णनानं एकदम खूष होऊन बन्याबापू म्हणाला, " शोधातच आहे मीं !—लेकाचा उंदराचा त्रास फार झाला आहे अलीकडे ! मांजर आणलं असतं, पण आमच्या निमाला मांजरं आवडत नाहींत, तेव्हां म्हटलं, एकादा बच्चा-इ-कुत्ता मिळाला तर पाहावा ! तुला याची निकड आहे का ? "

" निकड ? मीं म्हणतों आहें, याला कुणी तुझ्यासारखा प्रेमळ पालक मिळेल तर पाहावा ! आमचा काय सारा उडाव कारभार ! मग घेतोस पत्कर ? "

" अगदीं एका पायावर ! —मग घेऊन जाऊं का आजच ? "

" जरूर ! "

" अच्छा, थँक्स ! " प्रेमभरानं वश्याचा हात दाबीत बन्या म्हणाला, " पण नामकरण वगैरे कांहीं केलं आहेस का याचं ? "

" तसा बारशाचा समारंभ कांहीं केला नाहीं ! " वश्या हंसत म्हणाला, " पण आम्ही याला राजा म्हणून हाक मारतों ! "

" राजा !-वा सुंदर ! " इतकंच म्हणून राजाला बन्याबापूनं आणखी एक-दोनदां थोपटलं आणि तो वश्याचा निरोप घेऊन राजासह घराच्या रोखानं एक-दो करीत त्वरेनं निघाला.

अनंत हस्तें कमलावरानें एकदा द्यायला सुरुवात केली, कीं घेतांघेतांच तुमची तारांबळ उडून जाते म्हणतात. तोच अनुभव थोड्या निराळ्या प्रकारं बन्याबापूला येऊं लागला. राजाला घरीं आल्यावर निर्मला कांहीं-तरी आक्षेप घेईल अशी भीति त्याला वाटली होती; पण उलट तिनं त्याचं

मोठया कौतुकानं स्वागतच केलं. 'राजाला पाहून आत्याला फार आनंद होईल ! तिला कुत्र्यांची फार आवड आहे हा ! ' असं उद्गार काढून राजाची नीट व्यवस्था लावण्याचंही काम तिनं मोठ्या हौसेनं पत्करलं. बन्याबापूला आपल्या या सुदैवाचं मोठं कौतुक वाटूं लागलं आणि दैव असं सानुकुल असल्यावर पुढचा आपला व्यूह पार पडायला कितीसा वेळ, असाही मोठा गोड विचार त्याच्या मनात येऊन गेला. निर्मला दुसऱ्या दिवशीं दुपारीं आपल्या महिला समाजात गली, कीं हळूच घरीं येऊन राजाकरवीं त्या ' चिन्या'ची भंबेरी उडविण्याचा हा कार्यक्रम उरकावयाचा, असा त्यानं तावडतोब बेत आंखूनही टाकला. निर्मला महिला समाजांतून परस्पर स्टेशनवर जाणार असल्यानं तेवढ्या वेळांत तिला दाद लागू न देतां आपल्याला हा कार्यक्रम उरकून पुन्हां हपिसमध्ये सहज पळ काढतां येईल अशीही अटकळ त्यानं बांधली होती. त्यानंतर निर्मला न् ठकुआत्या घरीं येतील, न् आपल्या आवडत्या फुलदाणीची झालेली ती अवस्था पाहून ठकुआत्या भयंकर रुष्ट होईल आणि त्या रोषाच्या भरात ती आल्यापावलीं परत जायलाही निघेल—अन् तसं झालं, तर सुंठीवांचून खोकला गेला—किंवा एका दगडानं दोन पक्षी मारल्यासारखं होतील......

आणि याच उत्साही विचाराच्या ढगावर तरंगत बन्याबापू दुसऱ्या दिवशीं मिनिटभर लवकरच हपिसात गेला अन् सुमारें दोन तासांतच परत आला. निर्मला बाहेर गली कीं राजाला आतच बांधून ठेवायचं असं ठरलं होतं. पण राजावरील या बंधनाची अडचण, राजाच्या गळ्यांतील पट्टयाला सांखळी-ऐवजीं एक साधी सैलशी दोरी अडकवून बन्याबापूनं दूर केली होती. ही दोरी राजाला तोडतां येणं फारसं कठीण नव्हत. घराच्या कुलुपाची एक किल्ली बन्याबापूकडं असल्यानं निर्मलेच्या गैरहजेरींत घरात प्रवेश मिळवायचीही त्याला अडचण पडणार नव्हतीच. अशा प्रकारं सारो धोरणं पूर्णपणं सांभाळून त्यानं हल्ल्याची तयारी तर जय्यत केली होती !

चोरपावलानीं जिना चढून बन्याबापू आपल्या ब्लॉकच्या दारापाशीं आला. दरवाजा उघडण्यासाठीं खिशातल्या स्पेअर किल्लीलाही त्यानं हात

घातला. तोंच दाराकडे त्याची नजर गेली अन् तें सताड उघडं पाहून तो स्तंभितच झाला. अन् मग त्या दारांतच त्याला जी आकृति दिसली, तिला पाहून तर तो साफ थिजूनच गेला !

पण दुसऱ्याच क्षणीं, अशा बिकट प्रसंगीं त्याला हटकून हात देणारी त्याची उपजत प्रसंगावधान बुद्धि जागृत झाली आणि मुद्रेवरील आश्चर्याचा रंग क्षणांत पालटून हर्षयुक्त हास्याचा एक फवारा उडवीत तो उद्गारला,

" आलांत माई ? तुम्ही येणार म्हणून अर्ध्यावरच हपिस टाकून आलों लगबग घरीं हा ! स्टेशनवरच येणार होतों, पण म्हटलं चुकामुक व्हायची !–"

" होय तर रे ! " ठकुआत्या त्याचा तो गोड हास्याभिनय पाहून म्हणाल्या, " दुसऱ्या गाडीनं येणार म्हणून लिहिलं होतं मीं; पण पहिल्याच गाडीनं आल्यें ही ! एकदां यायचं म्हटलं कीं मला चइन पडतंय होय ? "

अन् मग सावधपणं अन् अक्कलहुषारीनं ठकुआत्याला रूचतील असे गप्पांचे विषय काढायला बन्याबापूनं सुरूवात केली. ठकुआत्यांनीं अपेक्षे- पेक्षां लवकर ही आगंतुकी करून आपला सारा व्यूह ढांसळून पाडला, याबद्दल मनांतल्या मनांत तो खूब चरफडत होता. अन् याच वेळीं शेंपूट हालवीत पुढं आलेल्या राजाला पाहून तर त्याचा विषाद उफाळूनच वर येऊं लागला. त्यानं राजाचे पुढचे पाय धरून त्याला जवळ ओढलं न् ठकुआत्यांची नजर दुसरीकडे आहे असं पाहून सडकून दांतओठ खाऊन घेत तो म्हणाला, " राजा लेका, आपल्या माईआत्या आल्या आहेत— पाहिल्यास ? ओळख देऊं का करून तुझी, लेका ? "

ठकुआत्यांनीं चमकून बन्याकडे पाहिलं आणि डोळ्यांना कमालीचा ताण देत त्या म्हणाल्या, " आं !—बन्या, कुणाला म्हणतो आहेस राजा ? "

" कां !—हा आमचा राजा, आत्या ! या कुत्र्या–इ–कुत्र्याला आम्ही राजा असं म्हणतों ! "— बन्याबापूनं हंसत खुलासा केला.

" हा राजा !—" ठकुआत्या त्याच्यावर डोळे रोखून म्हणाल्या, " कुणी सांगितलं तुला ? बन्या, तुझा अजून बालपणींचा तो आचरटपणा गेला नाहीं का ?—हा राजा का ? "

" मग—मग—"

" अरे ही माझी राणी ! न् हिची न् तुझी ओळख केव्हांपासून झाली !"

" राणी ?—तुमची राणी ही ? "

" हो, बरोबरच घेऊन आल्यें नाहीं का मीं हिला ? चांगलं रुपयाचं तिकीट काढून घेऊन आल्यें हो !—म्हटलं, मीं तिथं जागेवर नसलें तर आबाळ नाहीं का होणार माझ्या राणीची ? "

" ही राणी ? हा राजा नव्हे ? " बन्याबापू पुन्हा गोंधळलेल्या स्वरांत ओरडला.

" इश्श ! इतकं नाहीं का उमगतां येत ? " निर्मला यावेळीं आंत आली होती, ती म्हणाली, " तो तुमचा राजा कोंपऱ्यांत डाराडूर झोंपला आहे पाहा ! "

बन्याबापूनं पाहिलं तों खरंच, राजा कोंपऱ्यांत आरामशीरपणं पहुडला होता. त्याच्याकडे एकदां अन् आपल्या अंगावर पाय ठेवण्याचा प्रयत्न करीत असलेल्या राणीकडे एकदां त्यानं आळीपाळीनं पाहिलं अन् मग तो हंसत म्हणाला,

"माई, तुमची राणी आमच्या राजाप्रमाणंच जवळ जवळ दिसतेय् कीं ! "

" पण ती बावळट नाहीं आहे त्याच्यासारखी किंवा तुझ्यासारखीही म्हणेनास ! आपलं माणूस पटकन् ओळखून काढते हो ती—" अन् मग निर्मलेकडे वळून त्या म्हणाल्या, " निमा, अग, तुझ्या या आचरट राजाला हुषार नाहीं का केलास अजून ? कायमच राहिलेला दिसतोय् त्याचा तो खुळचटपणा ! "

आपल्याला ठकुआत्यांनीं दिलेलं तें प्रशस्तिपत्रक ऐकून अन् त्यांच्या त्या लाडक्या भाचीनं त्यावर मान डोलविलेली पाहून बन्याबापूच्या हृदयांत सुरीच भोसकल्याप्रमाणं झालं म्हणे ! न् त्यानं त्याच क्षणीं भीष्मप्रतिज्ञाच करून टाकली, कीं ठकुआत्यानं आज जरी आपला डाव साधायची संधि हुकवली, तरी पहिली संधि मिळतांच हा डाव सिद्धीला न्यायचाच !

अन त्याला हवी होती तशीच ही संधि दुसऱ्या नव्हे तिसऱ्या दिवशीं त्याला मिळाली. त्या दिवशी निर्मला ठकुआत्यांना आपल्या महिला समाजांत घेऊन जाणार होती. अन् तो शनिवार असल्यामुळं ऑफिसांतून खास रजा न काढता आपला बेत त्याला सोयीस्करपणं उरकतां येणार होता.

शिवाय राजाकरवीं त्या ' चिन्या 'चा फडशा पाडणं आतां अधिकच सुलभ होणार होतं. त्या ' चिन्या' नं आतां मध्य मेजावरच फिरून मानाचं स्थान पटकावलं होत. बन्याबापूची त्यावर रुष्ट नजर गेलेली पाहताच " आत्याच्या समजुतीखातर थोड दिवस ! " असा निर्मलेनं हंसत डोळे उडवीत त्याच्या कानांत खुलासा केला होता. पण राजाला या मेजावर उडी घेणं सोपं होणार असल्यामुळं बन्याला हें स्थानांतर आता फायदेशीरच वाटत होतं. 'चिन्या'वर हल्ला चढवायचं ट्रेनिंग राजाला देण्यासाठीं बन्या-बापू मधून मधून राजाला हळूच त्यावर छू छू करी आणि राजाही त्याच्या सांगण्याप्रमाणं दोरी तोडून पुढं झेप घेण्याची धडपड करी. त्या मध्य मेजाच्या खालींच राणीनं बैठक ठोकली होती. राणीला खोलीभर स्वच्छदपणं हिंडण्याचंही स्वातंत्र्य मिळालं होतं. हिंडून ती दमली कीं त्या मध्य मेजाखालीं ऐटींत बैठक ठोकून कोपऱ्यांतल्या राजाकडे मोठ्या रूबाबानं ती पाहत राही न् तिचा तो दिमाख असह्य होऊनच कीं काय, राजा मधूनच गुर्र असा ध्वनि काढून आपल्या तीव्र निषेधाची तिला जाणीव करून दई

पूर्व दिवशींप्रमाणंच मोठ्या सावधगिरीनं जिना चढून बन्याबापू चोर-पावलानीं दाराकडे येऊन ठपला. पण काय दुर्दैव ! त्या दारानं आजही त्याला अपेक्षाभगाचा पुन्हां धक्का दिला. आज दार उघडं नव्हतं खरं, पण त्याला कुलुपही नव्हतं. आल्यापावलीं तसंच मागं फिरावं असं बन्याबापूला क्षणभर वाटलं. पण तितक्यातच आंत कांहीं तरी मोठीच खजबज चालू असल्याची जाणीव त्याच्या कानांनीं त्याला करून दिली. त्याचं कुतूहल जागृत झालं अन् दरवाजाला पत्र टाकण्यासाठीं ठेवलेल्या फटींतून त्यानं हलकेच आंत नजर फेकली...

—आणि आंत घडत असलेला तो प्रकार पाहतांच, त्याच्या अंगावर जरी कांटाच उभा राहिला नाहीं, तरी आंगावरून झुरळ फिरल्यासारखं कांहीं तरी होऊं लागलं खरं ! प्रथम त्याला वाटलं, आंतल्या त्या छोट्या मेजा-पाशीं राजाची स्वारी राणीशीं प्रीतीच्या गुलगुल गोष्टी करण्यांत दंग झाली असावी. पण दुसऱ्याच क्षणीं त्याच्या लक्षांत आलं, कीं ही बातचीत प्रीतीची नसून कटु कलहाची आहे ! अंगांत कसलं तरी तुफान वारं संचारल्याप्रमाणं राजा घुमत होता, आणि राणीनंही श्वानासूरमर्दिनीचा अवसर आणून जोराचं थैमान मांडलं होतं. त्यांना आवरण्याकरितां निर्मला एका बाजूला आणि ठकुआत्या दुसऱ्या बाजूला विचित्र हातवारे करीत व तोडानं राजा-राणीच्या नांवानं शंख फुंकीत उभ्या होत्या ! पण राजा अथवा राणी कुणीही त्यांच्या त्या आर्जवाला जरासुद्धां जुमानीत नव्हती. आणि त्यामुळ या मध्यस्थांची स्थिति मात्र अतिशय केविलवाणी होऊं लागली होती.

बन्याबापूला राहवेना ! आपल्याही अंगात कसलं तरी वारं संचारल्याचा भास त्याला झाला ! त्यानं दारावरची घंटी जोरजोरानं चारचारदां दाबली. आणि निर्मलेनं धांवत येऊन दरवाजा उघडतांच तीरासारखी त्यानं आंत धाव घेतली. पळभरांत त्या छोट्या रणांगणावर येऊन राजाला त्यानं मागं ओढण्याचा प्रयत्न केला. पण तो उलट अधिकच गुरगुरू लागलेला पाहून कांहीं तरी शस्त्र शोधण्यासाठीं म्हणून बन्याबापूनं आजूबाजूला पाहिलं आणि मग मागचा पुढचा विचार न करता मधल्या मेजावरच्या त्या ' चिन्या '-लाच त्यानं अलगद उचललं न् राजाराणीच्या मध्येच जोरानं थाडकन त्याला झोंकून दिलं !

त्या ' चिन्या 'च्या अंगीं काय जादू होती कोण जाणें ! पण त्याच्या कपाळमोक्षाचा परिणाम जादूप्रमाणंच झाला यांत शंकाच नव्हती. राजानं राणीची मुस्करी सोडली आणि तो शेपटाला अधर दिशा दाखवीत निमूटपणं कोपऱ्यांत येऊन बसला. तो दूर जातांच ठकुआत्यांनीं राणीला चटकन् जवळ ओढलं अन् त्या तिच्या जखमांची पाहणी करूं लागल्या.

हा सारा प्रकार इतक्या तडकाफडकीं घडला, कीं काय घडलं हें बन्या-

बापूच्या प्रथम लक्षांतच येईना. पण मग जमिनीवर ठिकऱ्या होऊन पडलेल्या त्या ' चिन्या 'कडे नजर जातांच सर्रकन् एक भीतीची चमक त्याच्या सर्वांगांतून उसळून गेली. त्यानं निर्मलेकडे पाहिलं; ती डोळे फाडून आपल्याचकडे पाहत असल्याचं त्याला दिसून आलं. त्या तिच्या डोळ्यांत पुढील भयंकर स्फोटाची जाणीव करून देणारा धोक्याचा लाल कंदिलच जणूं त्याला दिसला आणि मिनिटापूर्वीचं त्याचं सारं अवसान पार गळून गेलं!

हळूच त्यानं ठकुआत्यांच्या चेहऱ्याकडे पाहण्याचा धीर केला आणि मग त्याला एक विस्मयाचा हादरा बसला. ठकुआत्यांच्या त्या डोळ्यांतून अपेक्षेप्रमाणं क्रोधाग्नीचे स्फुल्लिंग बाहेर पडण्याऐवजीं स्नेहार्द्रतेच्या सौम्य तुषाराचं कारंजंच उडत असल्याचं त्याला दिसून आलं. त्यानं डोळे आणखी ताणताणून पाहिलं आणि मग सरळ वर मान करून त्यांच्याकडे दृष्टिक्षेप केला. तशी त्या निर्मलेकडे पाहून उद्गारल्या,

" निमा, अग, अशी भेरकटासारखी पाहात काय उभी राहिलीस?— तुझ्या या राजाला चहा वगैरे नाहीं का द्यायचाय्!—बाकी या सहा महिन्यांत तूं त्याला अगदीं शूरवीर बनवून टाकलाय अं! लहानपणींचा तो बावळट बन्या पार बदलून गेला आहे हो!"

निर्मलेनं हंसत डोळे उडवून बन्याबापूकडं पाहिलं आणि मग ती त्या फुलदाणीचे तुकडे गोळा करण्यासाठीं खालीं वांकली. तें पाहून ठकुआत्या म्हणाल्या, " राहूंदे ग तें! तूं बन्याच्या चहापाण्याचं पहा अगोदर! दमून आला आहे तो हपिसांतनं. गधडे, हीच का आपल्या राजाची काळजी वहातेस ती?"

आतां बन्याबापूच्या चेहऱ्यावर मिस्कील हास्य चमकलं. तें पाहून निर्मलेनं अधरोष्ठ किंचित् चावून त्याला आंत जातांजातां वेडावून दाखविलं. बन्या ठकुआत्यांच्या समोरच असल्यामुळं त्याला त्याच तऱ्हेनं तिला कांहीं प्रत्युत्तर देतां आलं नाहीं. तो आत्यांना म्हणाला,

" मला वाटलं होतं, तुम्ही महिला समाजांत गेलां असाल!"

" जायलाच आम्ही निघालों होतों ना! पण राणीला कुठं ठेवावं हा प्रश्न

पडला. तितक्यांतच एक झुरळ त्या फुलदाणींतून बाहेर पडून जमिनीवर फिरूं लागलं न निमानं राणीला त्याच्यावर छू केलं. तें राजानं ऐकलं वाटतं, न् त्यानं एकदम दोरी तोडून पुढं झेंप घातली. पण झुरळाऐवजीं त्यानं पकडलं राणी-लाच ! राणी प्रथम बेसावध होती. पण मग दोघांची खूबच जुंपली. आम्हा दोघांनाही आवरेनाच कुणीही ! तूं ऐन वेळीं धांवून आलास म्हणून बरं झालं हो नाहीं तर माझ्या राणीचे हालच झाले असते !—बाकी भारी तिखट आहे हो तुझा राजा ! "

इतक्यात निर्मला चहाफराळाचं घेऊन बाहेर आली. तिच्याकडे वळून आत्या म्हणाल्या, " हं आता कसं ! प्रथम आपल्या राजाची वास्तपुस्त करावी न् मग बाकीचं पाहावं ! आतां कर ते तुकडे गोळा न् दे कचऱ्याच्या पेटींत फेकून ! "

निर्मलेनं विस्फारल्या डोळ्यांनीं ठकुआत्यांकडे पाहून म्हटलं, " पण-पण-"

" पण नाहीं न् कांहीं नाहीं ! झालं तें बरंच झालं ! नाहीं तरी, मीं त्या चिनी फुलदाणीचा निकालच लावणार होते ! त्याचसाठीं आलें होतें मीं म्हणेनास ! "

" आं--! त्याचसाठीं आलां होतां ? " बन्याबापूनं एकदम आ वासला.

" हो, तुम्हांला सांगायला कांहीं हरकत नाहीं म्हणा ! अन् तें सांगून टाकल्याशिवाय मला चइनही नाहीं पडायचं ! " ठकुआत्या म्हणाल्या, " ही जुनी फुलदाणी मी आहेर म्हणून दिली तुम्हांला, पण ती देतांना माझं मन मागंपुढंच होत होतं ! तसं म्हटलं तर ती कांहीं लहान सहान किंमतीची वस्तु नव्हती ! चांगले पांचशें तरी सहज आले असते. माझ्या एका इनाम-दार पेशंटनं त्यांच्या घरची डिलिव्हरीची अवघड केस उत्तम रीतीनं केल्याबद्दल मला नजर म्हणून त्यांच्याकडची ही प्राचीन दुर्मिळ फुलदाणी दिली होती. पण मला मात्र ती दृष्टिसमोर नकोशीच झाली होती ! "

" खरं अं ! पण कां-कां ? " निर्मला मध्येंच उद्गारली.

" ऐक ! ऐकून घे ! कुणी बोलत असतां मध्यें असं विचारूं नये

म्हणून कितीदां सांगितलं आहे तुला, गाढवे ! कधीं लागायची शिस्त तुला ?" ठकुआत्या झणकारल्या अन् मग त्या पुढं म्हणाल्या, " तसा कांहीं माझा गुन्हा त्या फुलदाणीनं केला नव्हता. पण त्यावरच्या त्या चिन्याचं तोंड आमच्या गुंडूमामंजीसारखं दिसे न् त्यांनींच मला अधिक त्रास दिला असल्यामुळं मला त्या फुलदाणीकडे पाहूं नयेसंच वाटायचं ! तरी पण एवढी मोलाची वस्तु फेकून तरी कशी द्यावी असं माझ्या मनांत येई अन् ती तशीच पुष्कळ वर्षं मेजावरच पडून होती ! तुमच्या लग्नाच्या वेळीं तुम्हांला ही आहेर म्हणून द्यावी असा मीं बेत केला. मला ती आवडली नाहीं म्हणून तुम्हाला आवडणार नाहीं असं थोडच आहे, शिवाय एक मोलाची वस्तु भेट दिल्यासारखं होईल, असं मला वाटलं अन् नाहीं होय म्हणतां म्हणतां मीं तुम्हांला ती देऊन तर टाकलीच. पण मग माझं मन मला सारखं खाऊं लागलं. ते मला म्हणूं लागलं, ' गधडे, तुला नको असलेली वस्तु त्या पोरांना त्यांच्या या मंगल प्रसंगीं तूं आहेर म्हणून दिलीस अं ! तुझ्या पांढऱ्या केसांना शोभलं का हें ! कुठं गेली तुझी अक्कल चुलींत ! तुझीं वर्षं न् तुझा शहाणपणा शेण खायला गेला का !' अन् मग विचार केला, कसंही करून ती फुलदाणी काढून घ्यावी तुमच्याकडनं न् तुम्हांला दुसरा कांहीं तरी आहेर द्यावा ! पण एकदां दिलेली वस्तु परत मागायची कशी, हाही प्रश्न पडला !—अखेर विचार करून मीं एक युक्ति योजली. म्हटलं, राणीला घेऊन तुमच्याकडे यावं अन् मग संधि साधून तुमच्या दृष्टीआड त्या ' चिन्या 'चा कपाळमोक्ष करावा अन् तुम्हांला सांगावं राणीनं त्याला पाडलं म्हणून !"

" अरेच्चा !—खरं अं ?—" बन्याबापूच्या तोंडून नकळत उद्गार बाहेर पडले.

" हो, अशीच युगत करणार होतें मी !—तों तूं ती पाळी येऊंच दिली नाहींस ! आतां बरं झालं, ही चिनी यादवीची पीडा नाहींशी झाली ती !—अन् त्या ' चिन्या 'बदली मीं ही अगदीं आधुनिक फॅशनची फुलदाणी घेऊन आलें आहें तुमच्यासाठीं !"

असं म्हणून ठकुआत्यांनीं आपल्या ट्रंकेंतून एक सुंदर उंची फुलदाणी काढून बन्याबापूच्या हातीं दिली आणि त्या हंसून म्हणाल्या,

" हिच्याशीं मात्र तुझी गुंडगिरी चालायची नाहीं बरं का !—अन् ऐकलंस, या फुलदाणीवर फोटो बसवायसाठीं एक पाकळी आहे, त्यांत तुम्हां राजाराणीची छबी बसवून घे तूं आजच ! म्हणजे मग पाहीन मीं ती डोळाभर !-मग करशील ना काम माझं एवढं ?"

बन्याबापू निर्मलेकडे पाहून हंसला आणि पटकन् उत्तरला, " ओ यस् ! बाय ऑल मीन्स !"

## धूम्रमय जगत

प्रीतीची भूल किती विलक्षण असते हें तिनं भुलावलेल्या जीवावांचून इतरांना कळायचं नाहीं! ही भूल तुम्हांला कोणत्या संकटांत पाडील अथवा कसल्या चमत्कारिक पेंचांत नेऊन टाकील याचा कांहींच नेम सांगतां यायचा नाहीं. अन् आमच्या धनंजयासारखा तुमचा स्वभाव असेल तर अशा संकटाच्या अगदीं वाऱ्यालाही तुम्ही उभे राहणार नाहीं! मग नारळगांवासारख्या त्या अनोळखी गांवांत स्वतः होऊन पडण्याची गोष्टच कशाला बोलायला हवी? आणि तसंच पाहायचं तर धनंजयही कांहीं त्या गांवांत स्वतः होऊन मुळींच आला नव्हता. त्याच्याच म्हणण्याप्रमाणं सांगायचं म्हणजे ते दोन सुंदर हंसरे डोळे, ती मोहक सरळ नासिका, ती नाजुक गोड जिव्हणी अन् ते गुलाब उमललेले गाल या सर्वांच्या हालचालींची त्याला आतांशा मोठी मौज वाटूं लागली नसती, तर नारळगांवचं तोंड देखील त्यानं पाहिलं नसतं. पण ही मौज त्याला इतकी वाटूं लागली होती, कीं तिच्यामुळंच धनंजयाची स्वारी आपल्या खादीच्या नव्या पोषाखांत आणि खादीचं आवरण चढविलेल्या बॅगसह नारळगांवीं एके दिवशीं अकस्मातच येऊन थडकली!

त्या खादीच्या कुडत्यांत धनंजयाला त्याच्या एखाद्या मित्रानं पाहिलं असतं, तर खचित तो आश्चर्यानं हतबुद्धच होऊन गेला असता. आपल्या अंगावरील तो नवा पोषाख त्याला स्वतःलाही विचित्रच वाटत होता. पण करतां काय? सुलभेचा आग्रहच पडला ना तसा! तिचे वडील

रावबहादुर गुणवंतराव सहस्रबुद्धे यांचं मन जिंकायचं तर या वेषाव्यतिरिक्त दुसरा कोणताही मार्ग नाहीं असं तिनं त्याला पटवून दिलं नसतं, तर तें खादीचं कुडतं त्यानं केव्हांच पेहरलंही नसतं. रावबहादुर गुणवंतराव सहस्रबुद्ध्यांना काँग्रेस–सरकार अधिकारारूढ होतांच आपल्या गतायुष्यांतील काँग्रेसद्रोहाबद्दल अशी काय सडकून उपरति झाली होती, कीं पहिल्याच झपाट्यासरशीं त्यांनीं आपल्या रावबहादुरीचं पदक गव्हर्नरकडे पाठवून दिलं आणि केवळ रावबहादुरी सोडूनच ते थांबले नाहींत, तर आपल्या आचारविचारांत व वागणुकींतही त्यांनीं क्षणांत फेरबदल घडवून आणला. खादीशिवाय त्यांच्या घरांत कोणताही कपडा दिसून येईनासा झाला. नवाकाळ, क्रॉनिकल आणि हरिजन यांखेरीज चवथं वर्तमानपत्र त्यांच्या बैठकीवर पडलेलं आढळून येईनासं झालं. दिवाणखान्यांतील कोपऱ्यातल्या छोट्या मेजावर जिथं पूर्वी ग्रामोफोन ठेवलेला दिसे, तेथें आतां एक भला मोठा चरखा दिसूं लागला. या चरख्याचं संगीत ऐकण्यांत, रावबहादुर काँग्रेस–राजकारणाच्या गप्पा मारून उरलेला आपला वेळ घालवूं लागले. फार काय, पण रावबहादुरांना सिगारेटचं इतकं दांडग व्यसन होतं, पण तेंही त्यांनीं आतांशा एकजात सोडून दिलं होतं.

धूम्रपानाच्या या व्यसनाबाबत तर त्यांच्या दृष्टिकोनांत इतकी पराकाष्ठेची क्रांति झाली होती, कीं ह्या व्यसनापायीं तरुण पिढी आपलं हृदय भाजून घेत आहे असं ते अगदीं निक्षून सांगत असत. धूम्रपानाची सक्तच मनाई त्यांच्या घरांत झाली होती. सिगार–सिगारेट तर सोडाच, पण देशी विडीचीही घाण त्यांच्या कपाळाला आतांशा जाऊन बसूं लागली होती. आपल्या एखाद्या गड्यानं कानावर चुकून विडी ठेवून दिलेली त्यांना आढळून आली ( त्यांच्यासमोर जातांना कान चांचपून जाण्याची आतां प्रत्येक गड्याला संवयच लागली होती म्हणा, पण त्यांतूनही ) कीं रावबहादुरांच्या सात्त्विक संतापाला पारावार उरत नसे आणि मग त्या बिचाऱ्या गड्याला तब्बल एक तासभर त्यांचं ' व्यसनें व आत्मशुद्धि ' हें गांवच्या वाचनालयांत थोड्याच दिवसांपूर्वी झालेलं व्याख्यान फिरून समग्र ऐकावं लागे !

रावबहादुरांच्या जीवनांत झालेली ही अपूर्व क्रांति पाहून लोक अचंबा पावत व त्यामुळं त्यांचं कांहीं लोकांकडून कौतुक तर कांहीं लोकांकडून कुचेष्टाही होई. पण रावबहादुर या कुचेष्टेला मुळींच भीक घालीत नसत. या कुचेष्टेपेक्षां जिल्ह्याच्या कॅांग्रेस–मुखपत्रांमध्यें आतांशा नेहमीं चमकूं लागलेल्या आपल्या नांवाकडे आणि त्यांत येणाऱ्या आपल्याविषयींच्या स्तुतिपर लेखांकडेच ते अधिक लक्ष पुरवीत असत. रावबहादुरांच्या या जीवनक्रांतीची संगति जिल्ह्यांतील एका मानसशास्त्री लेखकानं क्रिया व प्रति-क्रिया असा सिद्धान्त पुढें मांडून लावून दिली होती. त्याचा हा सिद्धान्त लोकांना आणि खुद्द रावबहादुरांनाही तितकासा समजला नव्हता, तरी तो लेख पाहून त्यांना संतोष व त्यांच्यापेक्षांही रावबहादुरीणबाईंना फार आनंद झाल्या-वांचून राहिला नाहीं. स्वतः रावबहादुर मात्र आपल्या जीवनांतील परिवर्तनाचं श्रेय रावबहादुरीणबाईंनाच देत असत. त्याच आपलं स्फूर्तिस्थान असल्याचं ते बोलूनही दाखवीत असत आणि ही गोष्ट अगदीं खरीही होती.

पण त्या चलाख पोरीनं धनंजयाला ज्या वेळीं ही सारी वस्तुस्थिति समजावून सांगितली, त्या वेळीं ह्या शेवटच्या मुद्दयावर जितका जोर देणं जरूर होतं तितका मात्र तो देण्याचं ती दुर्दैवानं विसरूनच गेली आणि यामुळं सुलभेच्या व आपल्या विवाहाला रावबहादुरांचीच केवळ अनुमति मिळवून भागणार नाहीं, तर रावबहादुरीणबाईंच्या अनुमतीचीही तेवढीच, किंबहुना अधिकच आवश्यकता आहे अन् त्यामुळं त्यांचंच मन वळविण्याची कोशीस करणं अधिक जरूर आहे, ही बाजू त्याच्या साफ दृष्टीआडच झाली होती. आणि याचा परिणाम असा झाला, कीं ज्या वेळीं त्याची अन् राव-बहादुर न् रावबहादुरीणबाईंची सुलभेनं ओळख करून दिली, त्या वेळीं राव-बहादुरांना त्यानं जितका लवून नमस्कार केला, तितका रावबहादुरीणबाईंना केला नाहीं, अन् रावबहादुरीणबाईंनीं त्याला आपादमस्तक न्याहाळून केलेले मोठाले डोळे आणि कपाळाला पाडलेल्या आंठ्याही त्याच्या लक्षांत येऊं शकल्या नाहींत !

पण धनंजयानं रावबहादुरीणबाईकडे त्या वेळीं अधिक लक्ष पुरविलं असतं तरीही त्याचा कांहीं फायदा झाला असता कीं नाहीं याची वानवाच होती. कारण रावबहादुरीणबाईचं किंबहुना साऱ्याच मंडळींचं लक्ष वेधून घेणारी तिसरीच एक व्यक्ति तिथं अगोदरच उपस्थित झाली होती. अन् त्या व्यक्तीच्या उपस्थितीचं प्रयोजन काय असावं या नव्या विचारानं त्याला आतां भारलं होतं.

" तुम्ही कुठं मुंबईलाच असतां वाटतं ?"

धनंजय एकदम भानावर आला. आतां ऐकलेले उद्गार याच व्यक्तीच्या कंठांतून बाहेर पडले होते.

आणि मग आपल्यालाच उद्देशून त्या व्यक्तीचा प्रश्न असल्याचं ध्यानांत येऊन तो उत्तरला, " हो, मुंबईतच ! "

" मुंबईतच का ? मग काय करतां तिथं ? "

" केमिकल टेक्नॉलजी..."

" हूं ! म्हणजे लार्जस्केल इंडस्ट्री–" सर्वांचं लक्ष वेधून घेणारी ती व्यक्ति मध्येंच उद्गारली, " पण देशाला सध्या गरज आहे कॉटेज इंडस्ट्रीची बरं का, बाबासाहेब ! "

" होय, होय !" रावबहादुर मान डोलावून चट्कन् म्हणाले, " तुमच्या त्या लेखांत होतं तें ! "

" तेंच तेंच ! तेंच मांडलंय् मीं त्यांत. तुम्हीं वाचलंय ना तें ? देशाला, शेतकऱ्याला खरी जरूरी आहे ती चरख्याची—म्हणजेच कॉटेज इंडस्ट्रीजची. देश म्हणजे शेतकरी अन् शेतकरी म्हणजे देश ! अगदीं पुरंपुरं आंकड्या-निशीं सिद्ध केलं आहे मीं हें ! अगदीं स्ट्रॉंग व्ह्यूज आहेत माझे या सब्जेक्टवर. थोड्याच दिवसांत बिलच आणणार आहें मी असेंब्लींत. "

" अगबाईऽऽऽ खरंऽऽ का ? " रावबहादुरीणबाई डोळे विस्फारून व स्वर उंचावून उद्गारल्या, " बिल आणणार आहां का ? मग आलं पाहिजे बाई आपल्याला मुंबईला त्या वेळीं !"

" बिल्, बिल्, बिल्—बिल् —पण पांढरं का करडं हो ? आपल्या मनी-सारखं का ग आई ?"

मध्येंच हा प्रश्न विचारणारी छोटी मूर्ति धनंजयाला मोठी चुणचुणीत वाटली. त्याला तिच्या प्रश्नाची गंमतही वाटली. पण इतरांचे चेहरे मात्र त्याला एकदम गंभीर झालेले दिसले. रावबहादुरीणबाई तर एकदम उसळून म्हणाल्या, " हात् वेडया ! मधेच कांहींतरी बडबडूं नये असं वेडयासारखं ! बिल म्हणजे मांजर नव्हे ! बिल म्हणजे कायदा ! आपले हे नागेशराव किनई मोठ्ठा कायदा करणार आहेत. तुला लहान मुलाला समजायचं नाहीं तें !"

" आमच्याएवढा तूं मोठा झालास कीं नाहीं म्हणजे सारं कळेल हो तुला हें. " नागेशराव चेहऱ्यावर हसूं आणून व सुलभेकडे वळून दृष्टिक्षेप करीत म्हणाले, " तेव्हां बरं का माईसाहेब, तुरुंगांत असतांनादेखील आमच्या ह्याच गोष्टी चालायच्या. लार्जस्केल इंडस्ट्री कीं कॉटेज इंडस्ट्री ? चरखा कीं धोटा ? आमचं आपलं एक आर्ग्युमेंट–शेतकरी म्हणजे देश आणि देश म्हणजे शेतकरी. कुठूनही खेडुतांचं हित पाहायचं ! माझ्या लेखांतही हेंच ठांसून सांगितलंय मीं ! कुमाराप्पालाही माझा तो पॉइंट फार आवडला !"

" कुमाराप्पा म्हणजे ते हे का ?–"

" हो तेच, तेच ! तेही होते तुरुंगांत आमच्याबरोबर ! बाकी तुरुंगांतले ते दिवस आम्हीं काढले म्हणजे काढले आहेत ! विसापूर तो ! एकीकडे हे हाल, दुसरीकडे तर हा वादाचा आनंद ! एकदा काय गंमत झाली, असाच वाद रंगांत आला होता. आमच्याबरोबर असलेले दे. भ. हरणेसाहेब मोठ्या कडाक्यानं बोलत होते; तोंच बाजूनं आवाज आला...फस्स–फस्स !—"

" अग बाई SSSS ! " रावबहादुरीणबाई एकदम शिरशिरल्या.

" गमतीचा भाग पुढंच आहे ! " नागेशराव जिव्हणी रुंदावून म्हणाले, " फुस्स म्हणून आवाज कुठून येतो म्हणून मी पाहतों तों काय ! एक भला मोठा साप फणा उंच करून उभा होता !"

" सा SS प—आई ग SSS ! " अंग शहारल्यासारखं करून रावबहा-दुरीणबाई किंचाळल्या आणि मग रावबहादुरांनीही उद्गार काढले,

" अरे बाप रे ! काय साप ? "

नागेशराव फिदीफिदी हंसून म्हणाले,

" नुसतं ऐकूनच तुम्हांला एवढी भीति वाटायला लागली अं ! मग त्या प्रसंगीं काय केलं असतंत ? तुरुंग होता तो ! देशकार्यासाठीं तुरुंगवास पत्करला, मग अशा प्रसंगांना तोंड द्यायला तयार असलंच पाहिजे ! बाकी आमचे दे. भ. हरणे मात्र सारेपुरे गळून गेले. त्यांचा तो आवेश, ती वीरश्री कुठच्या कुठं पळून गेली ! अशी धांदल उडालीय् त्यांची ! भागो मत, असं म्हणतच जो तो पळायला लागला लाठीहल्ल्याच्या वेळेसारखा ! आणि कां नाहीं पळणार ? सापाला मारावं म्हटलं तर हाताशीं काठी नाहीं का जवळपास दगडही नाहीं ! तितक्यांत वॉर्डर आला, पण तोही लेकाचा कचरूं लागला सापाला मारायला ! हत लेका, म्हटलं, ' साप कधीं पाहिलासच नाहीं का तूं ? ' असं म्हणून त्याच्या हातांतली काठी घेतली, पुढं सरसावलों अन् एक घाव घातला टाळक्यांत ! पण त्यासरशीं तो असा चवताळून आला अंगावर ! "

" स्ऽऽ अगो बाईऽ ! " रावबहादुरीणबाईंनीं ओठावरून जीभ फिरविली.

" पण तेवढ्यातच चलाखी करून मी तडाका दिला अन् खलास ! सारे मग गोळा झाले अन् मग वर्षाव सुरू झाला कॉंग्रॅटस्चा ! मीं म्हटलं, ' लेकांनो, या वेळीं सारे पुढं अं ' पण प्रत्यक्ष प्रसंग आला तेव्हां– ? "

असं म्हणून नागेशरावांनीं विजयानंदानं हसत हंसत सर्वांकडे पाहिलं.

रावबहादुरीणबाईंनीं एक मोठा निःश्वास टाकला आणि त्या उद्गारल्या,

" बरं झालं बाई ! मेला आला होता तरी कुटून तो ? बाकी आमचं भाग्य थोर हं ! "

पण सुलभेकडे सस्मित पाहून नागेशराव मध्येंच म्हणाले,

" छेः, तुमच्यापेक्षां माझंच भाग्य थोर ! "

नागेशरावांच्या मागोमाग धनंजयाचीही नजर याच वेळीं सुलभेकडे वळली आणि तत्क्षणींच त्यांच्या हृदयाचा म्हणे कोपरानूकोपरा हादरून गेल्यासारखा झाला !

त्याला नागेशरावांच्या त्या थोर भाग्याचा व त्याचप्रमाणं रावबहादुरीण-बाईंच्याही थोर भाग्याचा उलगडा होऊं लागला ! आणि याचा परिणाम असा झाला, कीं नागेशरावांनीं साप प्रकरणांतील आपल्या वीरश्रीचं वर्णन पुढं चालू करतांच धनंजयाचं नाक आपोआप वर उडालं आणि त्याच वेळीं त्याच्या गळयानंही ' उं: ' असा उद्‌गार काढून त्याला साथ दिली ! त्यासरशीं रावबहादुरीणबाईंनीं रोखून धनंजयाकडं पाहिलं नी त्याला विचारलं, " काय म्हणालांत ? "

" नाहीं, मीं म्हटलं-"

" कदाचित् विश्वास बसत नसेल त्यांचा मी सांगतों त्यावर—" नागेश-राव मध्येंच म्हणाले.

" तसं नव्हे; पण मी म्हणतों उंदीर अन् बेडूक मारण्यांत -"

" उंदीर अन् बेडूक नव्हे, साप—"

" असेल, साप असेल नाहीं तर दिवड असेल ! पण—"

" च् च् च् दिवड नव्हता तो साधा ! असा भला मोठा लांबच्या लांब अजगर होता—"

" असेल असेल, नाहीं म्हणत नाहीं मी, कदाचित् फुरसंही असेल, नाहीं-तर दुतोंडंही असेल, पण त्याला मारण्यांत एवढी बहादुरी आहे असं मला तरी निदान वाटत नाहीं. " धनंजयानं झटपट वाक्य पुरं केलं.

" तुम्हाला वाटत नाहीं ? " रावबहादुरांनीं धनंजयाकडे पाहून मध्येंच विचारलं.

" नाहीं वाटत ! " धनंजय ठासून म्हणाला.

नागेशराव फारच गंभीर होऊन म्हणाले, " गैरसमज होतो आहे तुमचा. मुंबईत राहून साप कसा असतो हें तुम्हीं पाहिलं नसावं कदाचित् अन् मला वाटतं, तुरुंगांतही जायचा प्रसंग तुमच्यावर कधीं आला नसेल !"

धनजयाचं नाक पुन्हां उडालं. पुन्हा 'उं' असा उद्गार त्याच्या गळयां-तून बाहेर पडला. तो म्हणाला, " सापच काय, पण सुसरीही पाहिल्या

आहेत मी! अन् तुरुंगांतच जाण्यानं मोठीशी देशभक्ति साधते असं नाहीं वाटत मला!"

"तुमचं असं मत आहे एकूण?" रावबहादुरांनीं पुन्हां एकदां डोळ्यांना वाजवीपेक्षां अधिक ताण दिला.

"हो." धनंजय पुन्हां ठांसून उत्तरला, "आणि तसा दिमाख कुणी दाखवूं लागला तर मी त्याची कींवच करीन!"

"कींव कराल अं?" रावबहादुरांनीं फिरून डोळे रोखले. नागेशराव आणि रावबहादुरीणबाई यांच्या डोळ्यांना तर आतां भलताच व्यायाम पडूं लागला! पण त्यांच्या डोळ्यांना इकडे हा असा व्यायाम घडत असतांनाच याच वेळीं सुलभेच्या आणि धनंजयाच्या नेत्राची अकस्मात् गांठ पडली. एरवींच्या समयीं असं मीलन झालं असतं, तर धनंजयाच्या अंतःकरणांत गुदगुल्या झाल्यावांचून खास राहिल्या नसत्या. पण या वेळीं त्या मीलनानं वेगळाच परिणाम घडवून आणला. सुलभेच्या डोळयांतील मूकभाव धनंजयानं तत्क्षणींच जाणला. त्याची दृष्टि आपल्या खादी-कुडत्याकडे वळली आणि त्यासरशीं त्याची चमत्कारिक अवस्था होऊन तो एकदम गप्प झाला!

त्यानं दिलेल्या त्या उत्तरावर मग एक-दोन शब्दांपलीकडे फारसं संभाषण न होतां बैठक आटोपली—अथवा रावबहादुरीणबाईंनीं 'हा इसम वाद-देखील घालण्याच्या लायकीचा नाहीं' अशाच तऱ्हेचा आविर्भाव मुद्रेवर आणून ती आटोपती घेतली असं म्हणणं अधिक शोभेल—म्हणून बरं झालं. नाहीं तर धनंजय म्हणतो त्याप्रमाणं त्याचा बुडता पाय सावरण्याच्या प्रयत्नांत कदाचित् अधिकच खोलात गेला असता! पण आतां तरी आणखीन् बुडायचं काय शिल्लक राहिलं होतं? रावबहादुर व रावबहादुरीणबाईंच्या मनांतून आपण पार उतरून गेलों आहों याबद्दल संशयच उरला नव्हता आतां त्याला. सुलभेच्या सहवासांत स्वर्गसुखाचा आस्वाद घेण्याचे आपले मनोरे धडाधड कोसळून पडूं लागलेले त्याच्या आंतल्या चक्षूंना दिसूं लागले. ऐन रखरखीत उन्हाच्या वेळीं प्रेमभंग झालेल्या कथानायकाला

भोवतालीं काळोख कसा दिसूं शकतो, याचं त्याला इतके दिवस फार नवल वाटे; पण या वेळीं त्याला ती कल्पना अगदीं अचूक पटली. अर्थात् या वेळीं अगदीं खरखीत असं ऊन कांहीं पडलेलं नव्हतं. दोनप्रहर केव्हांच उलटून सूर्य आतां मावळतीकडे झपाट्यानं झुकूं लागला होता. त्यामुळं झाडांच्या छाया लांबवर पसरल्या होत्या आणि उन्हाचा तापही बराच कमी झाला होता. शिवाय धनंजय बागेंतल्या ज्या बांकावर विरंगुळ्यासाठीं एकटाच येऊन बसला होता, तो बांकही आंब्याच्या एका विशाल वृक्षाखालीं मांडलेला होता. त्या झाडाच्या मागंच एक लहानसा गडगा अथवा भिंत होती. त्या भिंतीमुळें पलीकडच्या शेतकऱ्यांना अथवा गुरांवासरांनाही बागेंत काय चाललं आहे हें दिसत नसे. फारशा वर्णनाच्या भानगडींत न पडतां सांगायचं म्हणजे धनंजय ज्या ठिकाणीं येऊन बसला होता, ती जागा निवांत, निर्मनुष्य अशीच होती. अशा या निवांत स्थळीं डोक्यामागं दोन्ही हात घेऊन बांकाच्या पाठीवर रेलून धनंजय डोळे मिटून विचार करीत बसला होता आणि त्याच्या भोंवतालीं चक्क प्रकाश पडला होता तरी त्याला स्वतःला मात्र म्हणे अंधारच दिसत होता !

पण त्याची ही विचारतंद्री फार वेळ टिकली नाहीं. एकाएकीं मध्येंच सळसळ आवाज त्याला ऐकूं आला आणि त्याच क्षणीं आपल्या पायावरून कांहीं तरी सरपटत जात असल्याचा भासही त्याला झाला. दुपारच्या सापाच्या गोष्टीची आठवण अगदीं ताजी होती. त्यानं एकदम पाय झाडला व धडपडत उठून साप कुठं पडला हें पाहण्यासाठीं जमिनी-कडे नजर फेकली. परंतु साप त्याच्या कुठंच दृष्टीला पडेना. मग बाकाच्या मागं त्यानं वांकून पाहिलं, तों त्या ठिकाणीं सापाऐवजीं हातांत एक गव-ताची लांबशी काडी घेऊन अर्धवट स्वतःशींच डोळे मिचकावून हसत अंग चोरून बसलेली एक छोटी मनुष्याकृति त्याच्या नजरेला पडली !

धनंजयाच्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला अन् तत्क्षणीं त्या छोट्या प्राण्याचे कान पकडून आपल्या हाताचीं पांचही बोटं त्याच्या कानशिलावर उमटवावीं असं त्याला वाटलं. पण हा विचार क्षणभरच टिकला. कारण एक

तर ती छोटी मनुष्याकृति म्हणजे दुसरं कोणी नसून रावबहादुरांचे छोटे चिरंजीव चंदुराव होत हें त्याच्या लक्षात आलं होतं आणि यामुळं, साऱ्या घरांत ज्याची सहानुभूति तो गमावून बसला नव्हता, असं जें हें एकच माणूस होतं, त्याचा वाकडेपणा घ्यायला तो तयार नव्हता. आणि दुसरं म्हणजे त्या मूर्तीला मघाशीं पाहतांच त्याच्या मनांत तिच्याविषयीं कां कोण जाणं, पण थोडासा आपुलकीचा भाव उत्पन्न झाला होता. शिवाय पोरांचा वात्रटपणा असल्या कठोर उपायांनीं जिंकता येत नाहीं हेंही त्याला ठाऊक होतं. यामुळं अजूनही हसत असलेल्या पण आता थोडासा भेदरटपणा चर्येवर दिसूं लागलेल्या नी पळून जाण्याच्या तयारींत असलेल्या त्या मूर्तीकडे पाहून तो किंचित् हसला आणि म्हणाला, " ओहो राजेश्री ! तुम्ही का ते ?"

" अरे बाप रे ! नवे पाहुणे, तुम्ही ? " हाताचं बोट दातांत धरीत राजेश्री उद्‌गारले.

त्याच्या त्या आविर्भावाची धनंजयाला गंमत वाटली. त्यानं हसून विचारलं,

" मग तुला कोण वाटलं ? "

" मला वाटलं आमदारसाहेब ! "

" आमदारसाहेब ? "

" हो, ते दुसरे पाहुणे ! आई म्हणते ते मोठे आमदारसाहेब आहेत. मिनिष्टर होणार आहेत. "

" अस्सं ? "

" हो ! आणि आई म्हणते ते फार चांगले आहेत. पण ते फार वाईट आहेत ! "

" वाईट आहेत ? " धनंजयाला त्या छोट्या मूर्तीबद्दल वाटणारा आपलेपणा हवा भरलेल्या रबरी फुग्याप्रमाण वाढूं लागला. प्रेमभरानं तो तिच्याकडे पाहून हंसला आणि म्हणाला, " कां वाईट आहेत ? "

" मला आवडत नाहींत. काल त्यांनीं माझा उगाच गालगुच्चा घेतला ! "

" उगाच घेतला ? "

" तर ! मीं काय केलं होतं हो त्यांचं ? आमच्या मनीला त्यांच्या मांडीवर बसावंसं वाटलं-"

" मनी ? "

" मनी म्हणजे आमची मांजरी ! तिला बसावंसं वाटलं त्यांच्या मांडीवर. तेव्हां ते तुमच्यासारखेच एकटेच बसले होते. त्या वेळीं मीं तिला त्यांच्या मांडीवर नेऊन बसविलं. तशी ते धडक्यासरशीं उठले आणि मनीला थप्पड देऊन त्यांनीं ढकलून दिलं ! आमची मनी इतकी का वाईट आहे ? "

" कोण म्हणतो वाईट आहे ? मनीसारखी सुंदर मांजरी मिळायची नाहीं !"

" पाहा, आणि तिला त्यांनीं ढकलून दिलं, अन् माझा गालगुच्चा घेतल्यावर गाल दुखायचा नाहीं का हो ?"

" कां नाहीं दुखायचा ? "

" आणि त्यांनीं मला कधीं चॉकोलेटही दिलं नाहीं, तुम्हीं दिलंत तसं ! बरं का नवे पाहुणे, तुम्हीं ताईला दिलेलीं चॉकोलेटं मला तिनं दिलीं. ताई म्हणाली, ' कुणाला सांगूं नको, नव्या पाहुण्यांनीं दिलं आहे म्हणून. ' फार छान होतं हं. तसलं चॉकोलेट इकडे कुठंच मिळत नाहीं. "

" मुंबईला मी गेलों कीं आणखीन् पाठवून देईन तुला ! बरं, पण तुझी ताई कुठं—कशी काय आहे रे ? "

" ताई फार चांगली आहे. " चंदूनं उत्तर दिलं, " आणि नवे पाहुणे, एक जम्मत सांगूं का तुम्हाला ? "

" जम्मत ? "

" हं. आई म्हणाली, ' ताई आणि नवे पाहुणे–म्हणजे तुम्ही, केव्हां बोलत असलांत कीं मला येऊन सांग. आणि ती म्हणाली, ' कुणाला न सांगतां करायचं हें ' पण हें मीं ताईला सांगितलं. "

धनंजयाच्या मुद्रेवरचं हास्य एकदम मावळलं. सुलभेची व आपली गांठ मघाच्या त्या बैठकीनंतर चुकूनसुद्धां कशी पडूं शकली नाहीं याचं कारण त्याला आता उमगून आलं. त्यानं खालचा ओंठ किंचित् चावला.

" मग ताई काय म्हणाली ? " त्यानं विचारलं.

" ताई म्हणाली, बरं आहे. "

" बरं आहे, एवढंच ? "

" नाहीं. ती आणखी म्हणाली, तूं तिला म्हणजे आईला सांगूं नकोस ! तशी मीं तिला सांगितलं, मीं नाहीं सांगणार आईला कांहींसुद्धा ! तशी तिनं मला आणखी चॉकोलेट दिलं. तुम्हाला दुसरी एक जम्मत सांगूं का ? "

" हं. " अधीरतेनं धनंजय उद्गारला.

" मीं त्या आमदारसाहेबांची उद्यां जम्मत करणार आहें. " खदखदा हंसत छोटे रावबहादुर म्हणाले, " आजच्यासारखी नव्हे. पण आतां नाहीं सांगत मी तुम्हाला. उद्यांच सांगेन. आतां मला खेळायला जायचं आहे. "

आणि इतकंच म्हणून धनंजयाच्या उत्तराची वाट न पाहतां छोटे राव-बहादुर उड्या मारीतच तिथून पळून गेले.

धनंजय परत बांकावर येऊन विचार करीत बसला. नारळगांवीं येण्या-पूर्वीचा त्याचा उत्साह आतां पार मावळून गेला होता. सारं नारळगांव दुष्ट, कारस्थानी लोकांनीं भरलेलं आहे असं त्याला वाटूं लागलं. आपलं नारळ-गांव सृष्टिसौंदर्यानं नुसतं नटलेलं आहे अशी त्याची स्तुति सुलभेनं त्याच्या-जवळ केली होती. पण हें सौंदर्य आतां त्याला कुठंच दिसेना. सारी बाग रूक्ष, रखरखीत अशीच त्याला भासूं लागली. सहारासारख्या वाळवंटांत ' ओॲ-सिस ' नामं विसाव्याचीं स्थानं असतात, तसं एखादंही स्थान या उजाड गांवांत असूं नये ना, असा विचार त्याच्या मनात येतो तोंच समोरून झपझप पावलं टाकीत येत असलेल्या एका व्यक्तीनं त्याचं लक्ष वेधून घेतलं आणि या व्यक्तीकडे त्याची नजर गेली मात्र, एक विलक्षण पण मजेदार चमत्कार भोंवतालच्या दृश्यांत घडून आलेला त्याला दिसला ! मिनिटापूर्वीचं रूक्ष भासत असलेलं नारळगांव सृष्टिसौंदर्यानं कमालीचं भरून गेलेलं पुन्हा त्याला दिसूं लागलं !

ती व्यक्ति जवळ आल्यावर त्याला म्हणाली,

" शेवटीं केलातच घोटाळा ! "

" घोटाळा ? "

" नाहीं तर काय ? इतकं पढवून ठेवलं तरी सारं पालथ्या घड्यावर पाणी पडलं ! "

त्या व्यक्तीनं एक मधुर स्मित केलं आणि भुवयांची मजेदार मोडणी करीत ती पुढं म्हणाली, " आमच्या माईसाहेब तर पुन्याच गरम झाल्या आहेत. त्यांना तो बगळा म्हणजे–"

" कावळा ! बगळा नव्हे ! "

" कावळा म्हणा–"

" अन् नुसता कावळा नव्हे, डोमकावळा ! " दातांवर दांत जोरानं दाबून धनंजय उद्गारला.

" कबूल ! " सुलभा किंचित् मोठ्यानं हंसून म्हणाली, " डोमकावळाच आहे मेला तो ! पण आमच्या माईसाहेबांना तो मोर वाटतोय् ! दुपारीं तुम्हीं त्याचा अपमान करून आपला घोर अपराध केला, असंच माईसाहेबाना वाटतंय् ! बाबांना काय वाटतंय् हें मला ठाऊक नाहीं. पण कांहीं असलं तरी आतां प्रकरण मात्र फारच बिकट झालंय् एवढं तरी खरंच ! माईच्या संमतीला मी विचारीत नाहीं; पण बाबांची संमति तरी तिला दुखविलं तर कशी मिळणार ! अन् तिनं काय बेत केला आहे, ठाऊक आहे ? '

" काय ? "

" त्या डोमकावळ्याशीं माझी लग्नगांठ बांधून देणार आहेत त्या ! मघां कळलं मला हें सारं; अन् तोही मेला जेव्हां तेव्हां असा बघतो माझ्याकडे–"

" ती शंका आलीच मघाशीं ! " धनंजय चट्कन् उद्गारला, " अन् म्हणूनच मी आपलं सोंग पार विसरून गेलों त्या भरांत ! राहवेनाच मला. मी तरी काय करूं ? "

" पण त्यामुळं झालं काय, ठाऊक आहे ? बाबांच्या नव्या दृष्टीनं तुम्ही देशद्रोही ठरलात ! असल्या देशद्रोह्याशीं नातं जोडायला तयार व्हायचे नाहींत ते. त्यापेक्षां–"

" तो डोमकावळा त्यांना बरा वाटतो ? " धनंजयानं पुन्हा दांतांवर दांत चढवले.

" त्यांना कसाही वाटेना ! पण माईला वाटतो ना चांगला तो ! तो म्हणे आतां थोड्या वर्षांनीं मिनिस्टर होईल अन् मग बाबांनाही मिनिस्ट्रींत जागा मिळेल ! माईचं आहे हें पॉलिटिक्स सारं ! "

" मग आतां काय करायचं ? "

" तोच तर मोठा प्रश्न पडला आहे मला ! " वक्षस्थळावरून रुळत असलेल्या वेणीचा बो तळहातावर आपटून सुलभा म्हणाली, " माई तर माझ्या पहाऱ्यावर असते नुस्ती ! आतां माईकडे कुणी बायका आल्या आहेत गांवांतल्या, ती संधि साधून आलें मी इथं निसटून ! उद्यां किल्ला पाहायचा आपला बेतही हाणून पाडील ती कदाचित् ! नाहीं तर त्या डोमकावळ्यासकट सारी मंडळी यायला निघतील ! कुठून मेला लागलाय् तो राशीला देव जाणे ! "

" पण–पण यांतून सुटून जायचं कसं ? "

" पाहू या कसं जमतं तें ! बाबांच्या कानावर मी माझी इच्छा आत्तांच पत्रानं घालून ठेवणार आहें. पत्रही तयार केलं आहे ! त्यानं नाहीं जमलं तर मीं स्वतःच सरळसरळ विनवून पाहणार आहें त्यांना ! पण त्याचा कांहीं उपयोग होईलसं वाटत नाहीं मला ! कदाचित्–कदाचित् उलटपक्षीं त्यामुळं तुम्हाला इथून जायचीही ते पाळी आणतील आणि तसं झालं तर मग—"

सुलभेचा स्वर कंपित झाला. ती मध्येंच थांबली.

" तसं झालं तर आपण दोघंही जाऊं—" धनंजयानं तिचं वाक्य चटकन् पुरं केलं.

सुलभा तशाही स्थितींत किंचित् हंसली आणि म्हणाली, " माझी त्यालाही तयारी आहे. पण–पण तें असं तसं सहज जमण्यासारखं नाहीं. अन् शिवाय मग तो–तो गांवभर बोभाटा—निष्कारण डंका—"

ती पुन्हा क्षणभर थांबली आणि मग म्हणाली, " उद्यांपर्यंत तर अवधि आहे ना ? मग तोंपर्यंत पाहूं काय उपाय सुचतो तो ! "

सुलभा गेल्यानंतर धनंजयाच्या विषण्णतेंत अधिकच भर पडली. या वेळीं सूर्य मावळतीकडे अगदींच जाऊन टेकला होता. पृथ्वी अंधारांत बुडूं लागली होती आणि धनंजयाच्या अंतःकरणांतलाही काळोख आतां अधिकच गडद होऊं लागला होता. सारं नारळगांव त्याला पुन्हा भयाण, भेसूर दिसूं लागलं.

या मनःस्थितीमुळं त्याला जेवणही गेलं नाहीं; अथवा जेवतांना चाल-लेल्या गप्पांत फारसा त्यानं भागही घेतला नाहीं.

जेवण उरकून घेतल्यावर ज्या खोलीत त्याची झोंपण्याची व्यवस्था केलेली होती, त्या खोलींत तो तडक आला. खिडकींतून बाहेर त्यानं आपली शून्य दृष्टि फेकली. बाहेर सुंदर चादणं पडलं होतं. नारळगांवची वनश्री त्यात न्हाऊन निघाली होती.

धनंजयाच्या जागीं एखादा कवि असता, तर त्या प्रशान्त दृश्याकडे पाहून काव्याच्या एकामागून एक ओळी वाऱ्यावर फेकून देऊन आपल्या अंतःकरणांतील हलकल्लोळाला त्यानं वाट करून दिली असती. पण दुर्दैवानं धनंजयाला हा उपाय अगदींच अपरिचित होता !

तथापि बागेपलीकडच्या त्या चांदण्यांत एक चक्कर मारून आल्यास तेवढंच बरं वाटेल असं मात्र त्याला कांहीं वेळानं वाटल्यावाचून राहिलं नाहीं. तो विचार मनांत येतांच त्यानं आपलं नव नेहरू जाकीट अंगांत चढविलं आणि हळूच बाहेर येऊन कुणाचं आपल्याकडे लक्ष नाहींसं पाहून तो बंगल्याच्या फाटकाबाहेर पडला.

पण शेतांत आल्यावर पुढं अधिक न चालतां तिथंच कुठं तरी स्वस्थ बसावं असं त्याला वाटूं लागलं आणि मौज अशी कीं हा विचार त्याच्या मनांत आला त्याच वेळीं, अचूक त्याच वेळीं कोटाच्या खिशांत हात घालून चालायची त्याला संवय नसतांनाही त्याचा हात अंगांत घातलेल्या जाकिटाच्या खिशाकडे अगदीं सहजपणंच वळला !

आणि त्या हाताला त्या खिशांत एक चीज सांपडली अन् जितक्या

सहजपणं तो हात खिशाकडे वळला होता, तितक्याच सहजपणं त्या हातानं ती चीज बाहेर काढली !

ही चीज म्हणजे एक सिगारेटचं पाकिट होतं.

धनंजयाच्या धूम्रपानाच्या संबंधीबद्दल त्याच्या एखाद्या मित्राचा अभिप्राय तुम्ही विचारला असता तर त्यानं खास असंच सांगितलं असतं, की ह्या व्यसनांत धनंजय केवळ नवशिकाच नव्हता, तर त्याची त्याच्याशीं अजून पुरती तोंडओळखही झालेली नव्हती. केवळ मौजेखातर क्वचित् सिगरेट ओढणारा जो वर्ग असतो, त्यामध्येंच तो सध्या मोडत होता. प्रवासाच्या अथवा सुट्टीच्या समयीं मौजेचे क्षण अधिक असतात आणि यामुळंच नारळगांवीं येतांना त्यानं संधि मिळेल त्या वेळीं उपयोग करण्यासाठीं सढळ हातानं एक ' कॅपस्टन ' चा टिन खरेदी केला होता. पण तो टिन चुकून बॅगमध्येंच ठेवून दिल्यामुळं त्यानं स्टेशनवर आल्यावर एक पॅकेटही घेतलं होतं. हेच पॅकेट आता खिशांतून त्याच्या हातानं अचूक बाहेर काढलं होतं.

तें पॅकेट बाहेर काढतांच त्याचा तिथंच बसायचा विचार ठाम झाला. जवळच लांकडाचा मोठा ओंडका त्याच्या दृष्टीला पडला. त्या ओंडक्यावर तो बसला. पॅकेटमधील एक सिगारेट त्यानं बाहेर काढली. ती बोटाच्या नखावर एकदोनदा आपटल्यासारखी केली आणि दुसऱ्या खिशातून काडयाची पेटी काढून भर्रकन् ती सिगारेट शिलगावून तिच्या सुगंधी धुराचीं वलयं त्या धूसर रंगी हवेवर काढण्यांत तो निमग्न झाला.

विचारानं धूम्रपानाला जोर येतो कीं धूम्रपानानं विचाराला येतो याचं उत्तर निश्चितपणं देणं कठीण आहे. निदान धनंजयाकडे पाहून तरी त्या वेळीं हें उत्तर कुणालाही देता आलं नसत. त्याचीं दोन्हीं एंजिनं जोरात चालू होतीं. एकीकडे विचारांचे लोट त्याच्या मनात उसळत होते, तर त्याच वेळीं सभोंवतालची हवा सिगारेटच्या त्या सुगंधी धुराच्या लोटांनीं दरवळून जात होती. पण याचा परिणाम असा झाला कीं, हीं दोन्हीं एंजिनं चालविण्यांत मन व्यग्र झाल्यामुळं बाजूनं कोणी तरी आपल्याच रोखान झपाट्यानं

येत आहे हें, तें माणूस पंचरावीस हातांवर येऊन ठेपलं तरी त्याच्या लक्षांतच येऊं शकलं नाहीं.

मग मात्र त्याची दृष्टि अगदी अचानक त्या माणसाकडे गेली. आणि ती गेली मात्र, धनंजयाला असा एक धक्का बसला, कीं त्या धक्क्यासरशीं तो ताड्कन् उठला आणि पाय वळले त्या दिशेकडे त्यानं धूम ठोकली !

धांवण्याच्या शर्यतींत धनंजयानं बक्षिसं मिळविलीं नव्हतीं, तरी रावबहादुरांसारख्या एखाद्या वर्तुलाकार देहाच्या व्यक्तीला गुंगारा देणं म्हणजे त्याच्या पायाचा नुसता मळ होता. पण सुदैवानं तितकेही परिश्रम घेण्याची त्याच्यावर पाळीच आली नाहीं. कांहीं अंतर गेल्यावर धनंजयानं मागं वळून पाहिलं तों रावबहादुरांसारखी दिसलेली ती आकृति त्याचा पाठलाग सोडून मागं फिरलेली त्याच्या दृष्टीला पडली.

धनंजय तिथंच थांबला. त्यानं एक दीर्घ श्वास घेतला आणि सोडला. हातांतलं उरलेलं सिगारेटचं थोटूक त्यानं केव्हांच भिरकावून दिलं होतं. किंबहुना त्याच्या हातांतून तें नकळत गळून पडलं होतं, असं म्हणणं सत्याला अधिक धरून होईल. त्यानं पुन्हा आणखी एकदोन दीर्घ श्वास घेतले आणि नुकत्याच घडलेल्या त्या प्रकारावर तो विचार करूं लागला.

दुर्दैव एखाद्याच्या पाठीला हात धुऊन लागलं म्हणजे तें सारंपुरं कसं लागतं आणि एखाद्या इसमाला त्याच्या स्वतःच्याच हातून स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेण्यास हटकून कसं भाग पाडतं याची उत्तम प्रचीति त्या वेळीं धनंजयाला आली. रावबहादुरांसारखी त्याला दिसलेली ती व्यक्ति म्हणजे खरेच रावबहादुर असावे आणि आपल्या हातांतील जळती सिगारेट त्यांनीं पाहिली असावी याबद्दल त्याला मुळींच शंका वाटत नव्हती. रावबहादुरांसमोर त्या थाटात तो तसाच उभा राहिला असता तर ज्याबद्दल त्यानं त्यांची एवढी कीर्ति ऐकली होती तें त्यांचं 'व्यसनें व आत्मशुद्धि' हें व्याख्यान ऐकण्याचा प्रसंग त्याच्यावरही खात्रीनं ओढवला असता. पण याविषयींच्या विचारानंच जरी त्याचा थरकांप उडत होता, तरी त्या प्रसंगालाही त्यानं एकदा सोडून दहादा तोंड दिलं असतं. परंतु एवढ्यानं त्या

सिगारेटनं केलेला स्फोट भरून निघेल अशी त्याला मुळींच आशा वाटत नव्हती. किंबहुना आतां त्याच्या कसल्याच आशेला अणुभरदेखील जागा उरली नव्हती. अन् त्या निराशेच्या भरांत, दुसऱ्या दिवशीं रावबहादुरांची भेट होतांच जी आपली शोभा होणार होती तिची कल्पना येऊन तेथून बाहेरच्या बाहेरच निमटून जावं असाही एक विचार त्याच्या मनांत येऊन गेला. पण तो विचार येतो न येतो तोंच तो गोड चेहराही कुठूनसा अकस्मातच त्याच्या डोळ्यांपुढं उभा राहिला. मग मात्र काय होईल तें होवो असा विचार करून त्यानं आपले पाय बंगल्याच्या बाजूला वळविले आणि अद्यापिही उघड्या असलेल्या फाटकांतून इकडेतिकडे पाहत त्यानं हळूच आंत प्रवेश केला.

मनस्तापानं पोळून गेलेल्या, विशेषत: चोहोंकडे निराशेचा अंध:कार दिसत असलेल्या इसमाला सहसा झोप येऊं शकत नाही. त्यांतून तो इसम तरुण असून प्रेमभंगाच्या कड्याच्या अगदीं टोंकाला येऊन पोंचला असला आणि आजउद्यां आपली गच्छंति होईल अशी त्याची अवस्था असली म्हणजे पापणीला पापणी लागण्याचीही मुष्किल होऊन जाते.

अशा स्थितींत किती वेळ गेला कोण जाणे, पण शेवटीं एकदा गुंगीनं त्याच्यावर अंमल केलाच. तथापि ती विश्रांतीही त्याला फार वेळ लाभूं शकली नाहीं.

आपल्या अंगावरून कोणींतरी हात फिरवीत असल्याचा त्याला भास झाला. त्या स्पर्शानं तो दचकून जागा झाला. खोलींत अंधार होता तरी आपल्या पलंगाजवळ एक मनुष्य वांकून कांहींतरी चांचपडत आहे एवढं त्याच्या लक्षांत आलं. चोरच तो, यात शंका कसली ?

दुसरा एखादा इसम धनंजयाच्या जागीं असता तर त्यानं ओरड करून सारा बंगला हालवून सोडला असता; पण धनंजयानं पहिल्या आवेशासरशीं सरळ त्या आकृतीवरच झडप घालून तिला चांगलं गदागदा हालविलं आणि आतां तो तिला खालीं लोळवणार तोंच त्या आकृतीमधून ध्वनि उमटला–

" हू SSSS अहो S अहो SS अहो SSS–"

धनंजयाला आश्चर्याचा भला मोठा धक्का बसला! त्याच्या हाताची पकड चट्‌कन् सुटली आणि तो स्तंभित होऊन ओरडला,

" कोण ? रावबहादुर ? "

" हो-हो-हो-हो-! मी-मी-मी मीच तो ! " रावबहादुर चांचरत उद्गारले. अन् मग ते झटकन् पुढं म्हणाले,

" मी-मी इकडे आलों होतों तो-तो-तो-बट्, बट्, माचिस्-काडयाची पेटी आहे तुमच्याजवळ ? "

" काडयाची पेटी ? कां ? इलेक्ट्रिसिटी तर आहे इथं—" धनंजयानं बत्तीचं बटण दाबून म्हटलं.

" हो, आहे. पण—" एक आवंढा गिळून रावबहादुर म्हणाले, " पण —पण तुमची एक कॅपस्टन् देतां मला ! "

" कॅप्स्टन ? "

" हो हो, त्याचसाठीं—त्याचसाठीं—बट् विल यू ? जस्ट—"

" कॅप्स्टन म्हणजे आपली कॅप्स्टन ? " धनंजय आश्चर्यानं मध्येंच ओरडला.

" श्रूः श्रूः मोठयानं नका ओरडूं ! कॅप्स्टन म्हणजे कॅप्स्टन—सिगारेट —तीच हवी मला. त्याच—त्याचकरितां आलों होतों मी ! राहवेनाच मला ! सो नियर, बट सो SS फार अवे...इतकी जवळ पण इतकी दूर ! छेः, तुम्हाला कल्पना नाहीं ! "

" पण-पण-पण... "

" सांगतों—सारं सांगतों. आतां बोलूनच टाकतों तुमच्याजवळ सारं ! पण—पण आपण जरा कंफर्टेब्ली बसून बोलूं कीं—"

" पण—पण तुम्ही सोडून दिली होती ना ? "

" खरं—खरं तें, अन् खोटंही ! पण हें पाहा, आपण बसूं इथं अगोदर अन् मग करूया त्या गप्पा आरामशीरपणं ! "

" हो, हो, अवश्य अवश्य—" असं म्हणून रावबहादुरांचा आशय जाणून धनंजयानं आपली बॅगच उघडली आणि त्यांतला सिगारेटचा टिन

बाहेर काढून तोच सरळ रावबहादुरांच्या पुढ्यात ठेवला. रावबहादुरांनीं डबा उघडून त्यांतली एक सिगारेट घतली आणि धनंजयानं पुढं केलेली काड्यांची पेटी घेऊन सरावलेल्या धूम्रप्याप्रमाणं ती शिलगावली आणि मग जवळच असलेल्या खुर्चीवर अंग टाकून व सिगारेटचा एक जोराचा झुरका घेऊन ते उद्गारले,

" हाः ! अशा या थंडीच्या वेळीं सिगारेट म्हणजे......हाः...यू नो—चार महिने—तब्बल चार महिने स्पर्श नव्हता केला मीं हिला ! "

त्यांनीं पुन्हा एक जोराचा झुरका घेतला आणि मग क्षणभर धुराच्या एका जंगी फवाऱ्यांत ते अदृश्य झाले. त्या फवाऱ्यातून मग धनंजयाच्या कानीं शब्द येऊ लागले—

" तशी मीं क्वचित् पण अगदीं चोरून विडी ओढली एकदा नाहीं म्हणायला ! पण याची तलफ त्यान थोडीच भागते ! अन् शतपावली करण्याकरितां मीं जरा फाटकाबाहेर पडलों तव्हा तो वास अचानक कुठूनसा मला येऊं लागला. काय वाटल मला त्या वळीं ! गुंग होऊन गेलों मीं नुसता त्या वासानं ! कॅप्स्टनचाच तो वास हें लगच ओळखलं मीं अन् वास कुठून येतो म्हणून मीं इकडतिकडे पाहतों तों काय-तुमच्याच हातात ती दिसली. पण तुम्ही इतक्या झटक्यासरशा निघून जाल अशी कल्पना नव्हती मला ! " असं म्हणून रावबहादुरानीं सिगारेट चांगली मुठींत धरून आणखी एक दम मारला.

धनजयाच्या मुद्रवरील विस्मयाचा पारा अजून कमी झाला नव्हता. तो उद्गारला, " पण-पण...मीं ऐकलं होत..."

" ते खोटं नव्हतं..." रावबहादूर चटकन् उत्तरले, " आज चार महिने रावबहादुरी सोडून दिल्यापासून सिगारटही सोडून दिली होती मीं. वास्तविक ती सोडायचं काहीं कारण नव्हत. पण पक्का सोंगाड्या बनलों होतों ना मी ! स्पष्टच सागायचं म्हणज आमच्या सौभाग्यवतीची मोठी इच्छा कीं मीं कॉंग्रसच्या राजकारणांत पडाव. तिला वाटतय्, की कॉंग्रेसमध्यें मीं शिरलों कीं मी बडा मिनिस्टर होईन अन् आपण मिनिस्टरीणबाई होऊं...हाः हाः हाः..."

रावबहादुर मोठ्यानं हसूं लागले. मग सिगारेटची राख झाडीत ते म्हणाले,

" आ ऽ दॅट फॉंड होप! मनुष्य किती वेडा, आचरट बनतो कैक वेळां! इतका आचरटपणा करीत असतो तो कधींकधीं! अन् मागाहून मग त्याचं त्यालाच हसूं येतं—जाऊं द्या तें. मुद्द्याची गोष्ट ही कीं त्या विचारानं इतका हुरळून गेलों मी, कीं ही सिगारेटदेखील दिली एका झटक्यासरशीं सोडून! अन् मग एकदा तसा पुकार केल्यावर चोरून ओढायची देखील मुष्कील झाली कीं! अष्टौप्रहर कुणाचा तरी आहेच पहारा! पण एवढं खरं, कीं आजच्यासारखी तळमळ मात्र लागली नव्हती कधीं या चार महिन्यांत! मग्रां तो वास आला...अन् आतांपर्यंत सारी रात्र मीं जागून काढली अन् शेवटीं केलाच मनाचा निर्धार कीं तुमचं कुठं टिन, पॅकेट असेल तर त्यांतली एक गुपचूप घ्यावी अन् मनमुराद ओढावी! पण तुमची झोंप फार जागृत..."

रावबहादुरांनीं सिगारेटचं थोटूक फेकून दिलं आणि डब्यांतली दुसरी सिगारेट घेत ते म्हणाले,

" ओ ऽ! तुम्हीही घ्या कीं! बाकी आता मला किती मोकळं वाटायला लागलं आहे म्हणून सांगूं! इतके दिवस गुदमरून गेलों होतों मी नुसता! पहारा–म्हणजे किती पहारा–मनुष्यानं सहन तरी किती करायचा! तो–तो–सकाळींच येऊन ठाण मांडून बसलाय्..."

" डोमकावळा..." धनंजयानं मध्येंच जीभ चावली.

" एक्झॅक्टली, एक्झॅक्टली! डोमकावळा हाः हाः हाः हाः! छान, छान उडविलीत तुम्हीं काल दुपारीं त्याची!"

" छान उडवली?"

" इंडीड, इंडीड..."

पण रावबहादुरांचे पुढचे उद्गार त्यांच्या ओठांवरच राहिले; कारण त्याच वेळीं शेजारच्या खोलींतून " हू ऽऽऽ" असा विचित्र कंपित आवाज बाहेर पडलेला त्यांना ऐकूं आला. त्या आवाजाच्या अनुरोधानं ते दोघेही तत्क्षणींच

उठून बाहेर दिवाणखान्यांत आले, तों शेजारच्या खोलींतून एक व्यक्ति थरथरत, धडपडत बाहेर पडतांना त्यांना अस्पष्टपणं दिसली.

रावबहादुरांनीं बत्तीचं बटण दाबलं. त्या प्रकाशांत त्या व्यक्तीची नजर रावबहादुराकडे गेली. एकदोन आंवढे गिळून धापा टाकल्यासारखं करीत ती ओरडली, " साप...साप–"

" साप ? "

" होय...माझ्या खोलींत, तिपाईखालीं–"

" साप ? छट् ! " रावबहादुरांनीं जोरानं मान हालवून म्हटलं, " साप आमच्या बंगलींत कधीं शिरलेला नाहीं आतांपर्यंत ! तुम्हांला स्वप्न पडलं असेल, नागेशराव ! "

" स्वप्न नव्हे ! ह्या डोळ्यांनीं पाहिला ना मीं ! "

" अच्छा, पण चावला नाहीं ना तो तुम्हाला ? "

नागेशरावांची मान नकारार्थी हालली; ती पाहून रावबहादुर म्हणाले,

" मग कुछ फिकीर नहीं ! पाहूं बरं कुठं आहे तो साप !"

असं म्हणून रावबहादुरांनीं एक भला मोठा सोटा बाहेर जाऊन आणला. धनंजयाच्या हातांत त्यांनीं दुसरी एक तशीच काठी दिली आणि मग ते नागेशरावाच्या खोलींत शिरले.

साप शोधायला जावं आणि तिथं साप न सांपडतां निराळीच वस्तु दिसावी अशी परिस्थिति जेव्हा उद्भवते त्या वेळीं, " दोरीच्या सापा भिऊनि ऽ ऽ " अशी लकेर मारायचा उघडच जरी नाहीं तरी निदान मनांतल्या मनांत तरी मोह सहसा कुणाला आवरूं शकत नाहीं. पण दोरी आणि साप यांचा हा अन्योन्यसंबंध जुन्या जगांत शोभून दिसला, तरी आजच्या बदललेल्या आधुनिक जगांत तीच उपमा नेहमीच चालूं शकणार नाहीं ! निदान नागेशरावांच्या तिपाईखालचा तो साप पाहून धनंजयाला दोरीची उपमा कांहीं आठवली नाहीं एवढं तरी खरंच ! तिपाई-खालचा तो साप हातभरदेखील लांब नव्हता. रावबहादुरांनीं त्याला सोटयानं डिवचलं, तेव्हा तो हालला नाहीं कीं डोललाही नाहीं. धनंजयानंही काठी

म्हणून त्याला जागृत करायचा प्रयत्न केला; पण तो कांहीं केल्या जिवंतच होईना ! अखेरीस धनंजयानं खालीं वांकून त्याची परीक्षा केली आणि त्याला शेपटीला धरून वर उचलून प्रकाशांत धरलं.

त्याबरोबर रावबहादुर पोट धर धरून हंसूं लागले आणि नागेशराव मोठ्यानं सुस्कारले, " ओ ऽऽऽऽ-"

" हाः हाः हाः हाः " हंशाचा आणखी एक मजला चढवून रावबहादुर म्हणाले, " अरे, हा आमच्या चंद्याचा रबरी साप ! हाः हाः हाः ! पण हा इथं कसा आला ? त्या पोराचंच काम असलं पाहिजे—मोठं खट्याळ पोरटं आहे तें ! "

" आणखी मोठं डोकेबाज ! " धनंजयानं चटकन् दुजोरा दिला.

याच वेळीं रावबहादुरीणबाई व सुलभा यांनीं खोलींत प्रवेश केला. त्या अगदीं भांबावून गेल्या होत्या. सुलभेनं पुढं होऊन विचारलं,

" अग बाई ! बाबा, झालं तरी काय ? "

" सापाची शिकार ! हाः हाः हाः— "

" साप ! अग बाई, म्हणजे ! "

" आपल्यां या आमदारसाहेबांना आज हा रबरी साप चावणार होता...पण थोडक्यात चुकलं. हाः हाः हाः— "

" म्हणजे ? मला नाहीं बाई कांहीं उमजत ! सरळ सांगायचं ना काय तें ? "

" हें पाहा, हा रबरी साप आहे ना, तो आपल्या ह्या आमदारसाहेबांना नुकताच दिसला. चंद्यानं कुठं आणून टाकला होता वाटतं. अन् हा साप दिसतांच आमदारसाहेबांना तुरुंगांतल्या सापाची झाली आठवण अन् ते तसेच लटपटत बाहेर आले. मग आम्हीं दोघांनीं ह्या सापाला हुडकून काढला, पण तो लेकाचा अगोदरच मेला होता आमदारसाहेबांची भीति घेऊन ! आतां आलं लक्षात सारं ! अन् नसलं आलं तर विचारा ह्या वीरांना ! "

रावबहादुरीणबाई नागेशरावांच्या तोंडाकडे पाहूं लागल्या. नागेशराव अवसान आणून म्हणाले, " हें पाहा बाबासाहेब, हा माझा अपमान आहे... "

" अपमान ? "

" हं, मला इथं क्षणभरही राहायची इच्छा नाहीं अशा स्थितींत ! "

" ओ ऽ ओ ऽ ! क्षणभरही नाहीं ? "

" क्षणभरही नाहीं. "

" विचार कांहीं वाईट नाहीं. "

" ऑं ? "

" अन् शिवाय गाडीही आहे आतांच सहाची ! "

" अग बाई ऽ ! म्हणजे ! हें काय भलतंच आज ? "

" भलतंच आज नव्हे, भलतंच काल होतं. " रावबहादूर ठांसून म्हणाले, " आमदारसाहेबांना जायचीच इच्छा असली तर मीं त्यांना कसं अडवूं ? अच्छा, नमस्ते आमदारसाहब ! तुम्ही त्या खरी सापाच्या तडाख्यांतून निसटलात या आनंदाप्रीत्यर्थ आणखी दोन झुरके मारीन म्हणतों ! "

" अय्या ! बाबा ! "

" चूप बैस तूं सुले ! अन् आतां असं कर, गणूला उठवून दूध आणायला सांग गवळ्याकडून झटपट. चहा आज करायचा तू ! असा फक्कड चहा कर कीं या धनंजयरावांनीं मागणीच घातली पाहिजे तुला ! "

सुलभेनं धनंजयाच्या मुद्रेकडे हळूच दृष्टिक्षेप केला आणि ती सस्मित म्हणाली,

" पण बाबा "

पण रावबहादुर लगेच हंसत पुढं म्हणाले,

" तूं पोरी मोठी छान निवड केली आहेस ! पाहा, सत्य आहे अगदीं. हा कोंबडाच आरवला. आता धनंजयरावांच्या पसंतीचीच तवढी वाट पाहतों आहें मीं ! कां बुवा, आहे पसत आमची मुलगी ? "

धनंजय हसून उत्तरला,

" वा ऽ ! मग इथं इतका आलों तो आणखी कशासाठीं ? "

तितक्यात कुक्कुटराजानं पुन्हा दूरवरून उच्च स्वरांत ' कु कु कू कु ' केलेलं ऐकूं आलं. आणि या वेळचं त्याचं कु कु कु कु इतकं सुंदर होतं कीं तसं आरवणं धनंजयानं साऱ्या जन्मात कधीं ऐकलं नव्हत म्हणे !

# तुकारामाचं वेड !

मनुष्याच्या मनांत केव्हां केव्हां अशा विचित्र कल्पना येतात आणि अशी चमत्कारिक वागणूक त्याच्या हातून घडते, कीं त्याचं त्यालाच मागाहून त्याबद्दल आश्चर्य वाटत असतं ! आमच्या उल्हासाचंही असंच झालं. ती विचित्र कल्पना आपल्या डोक्यांत त्या वेळीं कशी यावी याचं कोडं त्याला अजूनही सुटलेलं नाहीं. मात्र ती कल्पना त्याच्या मनांत त्या वेळीं आली नसती, तर आज जबलपूरच्या नव्या कॉलेजांतील अध्यापकाची जी जागा त्याला मिळाली आहे ती मिळाली असती कीं नाहीं याची शंकाच आहे. कुणीं सांगावं, कदाचित् मिळालीही असती ! पण वस्तुस्थितिच पाहायची, तर ही जागा मिळायला त्याला ती कल्पनाच मूळ कारण झाली, एवढं तरी खरंच !

उन्हाळ्याची सुटी कशी घालवावी याबद्दलच्या प्रश्नावर त्या पतिपत्नींमध्यें मतभेदाचा प्रसंग उद्भवला होता. दोघांनींही आपला हट्टाग्रह सुरू केला; एकमेकांना हार जायला कोणींही तयार होईना. उल्हासानं जे बेत आंखले होते, ते सारे त्याच्या प्रिय पत्नीनं धुडकावून लावले; एवढंच नव्हे, पण उलट पक्षीं आपले स्वतःचे बेत तिनं त्याच्यापुढं मांडून हा आपला कार्यक्रम अमलांत आलाच पाहिजे अशी जोराची मागणी केली ! आणि प्रमिलेची ही 'महिला' वृत्ति जशी जागृत झाली, तशीच उल्हासच्या पुरुषी बाण्यानंही उचल खाल्ली. आणि अशा प्रकारं एका मोठ्या कडाक्याच्या पेंच-

प्रसंगाचं वातावरण त्यांच्या चिमुकल्या राज्यांत निर्माण झालं. प्रमिलेनं जो आपला कार्यक्रम पुढं मांडला होता, त्यांतील मुख्य कलम असं होतं कीं, ही उन्हाळ्याची सुटी दोघांनींही प्रमिलेच्या माहेरीं म्हणजे उल्हासच्या श्वशुरगृहीं घालवावी ! आणि उल्हासाचा मुख्य विरोध होता तो याच कलमाला होता !

केवळ श्वशुरगृहीं जाऊन येण्याचाच प्रश्न असता, तर उल्हासाची कांहींच हरकत नसती; पण तिथं जाण्यामुळं श्वशुरांच्या सहवासांत दिवस कंठणं त्याला जें भाग झालं असतं, तेंच त्याला नको होतं. उल्हासचे श्वशुर प्रो. नानासाहेब चक्रदेव ही व्यक्ति सहवासाला लायक नव्हती अशांतला मुळींच भाग नव्हता, अथवा प्रोफेसरसाहेबांनीं आपल्या जांवयाचं कांहीं कमी पडूं दिलं होतं म्हणून त्यांच्यामध्यें मतभेद उत्पन्न झाला होता, अशांतलाही प्रकार नव्हता. किंबहुना हा मतभेद उत्पन्न झाला असेल अशी कल्पनाही प्रोफेसरसाहेबांना नसावी. गणित हा विषय व त्याचे अध्यापक यांच्याबद्दल उल्हासानं केवढा भयंकर धाक घेतला होता याची कांहींच जाणीव त्यांना नव्हती. आणि उलट पक्षीं प्रोफेसरसाहेबांनीं सेवानिवृत्त झाल्या-नंतर अलीकडे एक वर्ष आपला अध्यापनाचा गणित हा विषय बाजूला सारून मानसशास्त्र व तत्त्वज्ञानशास्त्र या शास्त्रांचा ध्यास घेतला होता, ही त्याच्याबद्दलची अद्ययावत् माहिती उल्हासानंही करून घेतली नव्हती. याचा परिणाम असा झाला, कीं त्यांचं हें बदललेलं स्वरूप पाहून उल्हासाचा त्यांच्याविषयींचा जो पूर्वग्रह कदाचित् बदलूं शकला असता तो तसा बदलण्याचीही संधि आली नव्हती. आणि म्हणूनच प्रोफेसरसाहेबांच्या सहवासाबद्दल त्याला वाटणारी एक तऱ्हेची विचित्र भीति त्याच्या मनांतून मुळींच दूर झाली नव्हती.

अशा स्थितींत उल्हासानं या प्रकरणीं एक रेसभरही माघार घ्यायची तयारी दर्शवूं नये यांत आश्चर्य तें कसलं ? प्रतिपक्षाला हाणून पाडण्या-साठीं मोठ्या खंबीरपणं त्यानं नाना तऱ्हेचे युक्तिवाद लढविले; पण कोणत्याही युक्तिवादानं किल्ला सर व्हायचं चिन्ह दिसेना, तेव्हां मात्र तो

भडकलाच! त्यानं तावातावानं अंगांत कोट चढविला, पायांत चपला घातल्या आणि दाराच्या बाहेर पाऊल टाकतां टाकतां मागं वळून तो जरा धुश्शांतच उद्गारला,

"हें पाहा, तुझ्या अट्टाहासानं माझं डोकं उगाच भडकवून टाकते आहेस तूं! याचा परिणाम भलताच झाला, तर त्याची जबाबदारी माझ्या-वर नाहीं! लक्षांत ठेव—"

यावर प्रमिलेनं भुंवया रुंदावल्या, मानेला किंचित् हिसडा दिला आणि ती हंसून उद्गारली, "अग बाईऽ-"

या तिच्या कृतीचं उल्हासाला एरवीं इतकं कांहीं वाटलं नसतं. किंबहुना दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं या थट्टेचा स्वीकार त्यानं तितक्याच थट्टेच्या प्रत्युत्तरानं केला असता; पण आजचा प्रसंग बराच निराळा होता; स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे हक्क दिले, तरी त्यालाही थोडीबहुत मर्यादा ही आहेच अशा मताचा तो होता. प्रमिलेकडून आज हीच मर्यादा सोडून वर्तन होत आहे, असं त्याला वाटलं व तें त्याला रुचलंही नाहीं.

त्या आवेगांत मागं वळून न पाहतां धडधड जिना उतरून तो तडक खालीं आला. मात्र जिना उतरतां उतरतां "अग बाई, काय पण-" असे उद्गार त्याला ऐकूं आलेच व त्या मागोमाग—

"लवकर यायचं हं घरीं-आज तुकारामाला जायचंय्, लक्षात आहे ना?" असाही एक इषारा त्याच्या कानीं पडल्यावाचून राहिला नाहीं!

ह्या शेवटच्या उद्गारांनीं उल्हासाला आपल्या खिशांतील 'तुकाराम' चित्रपटाच्या पासांची एकदम आठवण करून दिली. ह्या आठवणीबरोबरच त्या चित्रपटांतील दृश्यही लागलींच त्याच्या दृष्टीसमोर नाचूं लागलीं; आणि हीं दृश्यं डोळयांपुढं उभीं राहतांच कुठूनशी एक मजेदार कल्पनाही त्याच्या डोक्यांत अकस्मातच घुसली!

हा चित्रपट त्यानं स्वतः एकदां असाच योग आला असतांना पाहिला होता. मात्र त्या वेळीं कोणताही चित्रपट प्रमिलेसह म्हणजे दोघांनींही मिळून

पाहायचा, या त्यांच्या नियमांत खंड पडला होता. ही गोष्ट अर्थातच प्रमिलेच्या नकळत झाली होती. त्याची भरपाई करण्यासाठीं त्यानं आज मुद्दाम आपल्या एका मित्राकरवीं दोन पास मिळवून आणले होते. व हा चित्रपट समारंभपूर्वक व थाटात पाहण्याची योजना सकाळींच आखून ठेविली होती. याच योजनेची प्रमिलेनं त्याला आतां आठवण करून दिली होती. पण ती अशा स्थितींत, कीं पहिल्या सपाट्याला ती रद्द करून टाकायचाच विचार त्याच्या मनात येऊन गेल्याखेरीज राहिला नाहीं. पण दुसऱ्याच क्षणीं ती नवी कल्पना त्याच्या डोक्यांत शिरल्याबरोबर हा विचार मागं पडला आणि सिनेमाची ही योजना अंमलात आणायच तर त्यानं ठरविलंच; परंतु त्या कल्पनेने सुचवून दिलेल्या दुसऱ्याही एका योजनेला मूर्त स्वरूप द्यायचा तो विचार करूं लागला !

ह्या चित्रपटाचा इतरांच्या मनावर काय परिणाम झाला असेल तो असो, पण उल्हासनं ज्या वेळीं तो प्रथम पाहिला त्या वेळीं काहीं अल्प काल कां होईना, पण त्याचं मन भक्तिरसानं ओथबून गेल्याखेरीज राहिलं नव्हतं. हा परिणाम अतिशय तीव्र स्वरूपात झाला, कीं तेच वेड एखा-द्याच्या डोक्यात ठाण माडून बसायला उशीर लागणार नाहीं, अशीही अट-कळ त्यानं आपल्या मनाशीं केली. कोणा एकाला असंच वेड लागल्याची बातमी दोन दिवसापूर्वीच त्याच्या ऐकिवातही येऊन गेली होती. त्याच्या मनांत जी कल्पना आल्याच आरंभीं सागितलं आहे ती हीच होती. अशीच भूमिका त्यानं स्वत: स्वीकारण्याचं ठरवून टाकलं. ह्या भूमिकेमुळं प्रमिलेला तिनं केलेल्या अपमानाबद्दल योग्य प्रायश्चित्त देता येईल असा एक विचार त्यानं केला आणि शिवाय बरीचशी गंमतही यामुळं करतां येतील असा दुसराही विचार त्याच्या मनात आला. भूमिका यशस्वी झाली, तर बरंच झालं; फसली तरीही हरकत नाही ! गाजराची पुंगी, वाजली तर वाजली, नाहीं तर मोडून खाल्ली, अशाच दृष्टीन तो या साऱ्या प्रकाराकडे पाहत होता; एवढंच कीं, ही पुंगी मोडून कशी खायची हें मात्र त्यानं तेव्हां ठरविलं नव्हतं !

ज्या क्षणीं उल्हासानें आपल्या ह्या योजनेला म्हणा अथवा प्रयोगाला म्हणा सुरुवात केली तो क्षण अत्यंत शुभ किंवा सुदैवी होता असंच म्हटलं पाहिजे. ही त्याची सुरुवात दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर तावडतोब झाली. आदल्या दिवशीं रात्रीं प्रमिलेच्या इषाऱ्याप्रमाणं तो घरीं लवकर परतला. दोघांनीं शेवटच्या खेळाला जाऊन, ठरविलेली योजना यशस्वीपणें पारही पाडली. पण या साऱ्या अवधींत 'हं' किंवा फार तर 'हूं' या उद्गारां-पलीकडे अधिक मजल जाऊं न देण्याची त्यानें पुरी खबरदारी घेतली होती. आपली मुद्राही त्यानं शक्य तितकी गंभीर ठेवली होती. आणि गंमत अशी कीं, उल्हासानं इतकं ओढून धरलेलं पाहतांच त्या पोरीनंही त्याच्याच नाण्यांत त्याची भरपाई केली! सकाळीं मात्र हें मौनव्रत त्यानं पार झुगा-रून दिलं. मुद्रेवरील गंभीरतेमध्यें मात्र त्यानं यत्किंचित्‌ही कमतरता पडूं दिली नव्हती; ही गंभीरता कायम असल्याबद्दलची खात्री करून घेण्यासाठीं आरशांतही त्यानं प्रमिलेची नजर चुकवून हळूच पाहून घेतलं, आणि ती खात्री झाल्यानंतर चहाचा पेला पुढ्यांत येताक्षणींच एक वेळ त्याकडे दृष्टिक्षेप केला आणि मग मोठा गळा काढून तो गाऊं लागला,

"पांडुरंग ध्यानीं, पांडुरंग मनीं—"

सुदैवानं उल्हासाला गोड गळयाची देणगी मुळींच लाभली नव्हती; आज-कालच्या तरुणाप्रमाणं तो 'स्नानगृहगायक' ही नव्हता. कधीं क्वचित्‌ नाटकातील पदं गुणगुणण्यापलीकडे गाणं असं त्यानं केव्हाही म्हटलं नव्हतं आणि मोठ्या आवाजांत पदं म्हणतांना तर कोणी त्याला कधींच ऐकलं नव्हतं; आणि तसंच पाहिलं तर लहानपणीं 'एका कोळियाने एकदा आपुलें—' ही कविता घरीं आलेल्या एका पाहुण्याला मोठ्या सुरांत म्हणून दाखविण्यापलीकडे काव्यगायनही करायच्या भानगडींत तो कधींच पडला नव्हता.

यामुळं त्याच्या गळयांतून बाहेर पडूं लागलेल्या त्या सुराचा परिणाम पहिल्याच फटकाऱ्याला कसा अगदीं जादूप्रमाणं झाला! त्या सुरांत भक्ति-रसाचा ओलावा आणणं त्याला तितकंसं जमलं नव्हतं; पण, आर्तता मात्र

त्यांत त्यानं भरपूर आणली होती. पहिल्याच कडव्यासरशीं प्रमिलेचं लक्ष व डोळे त्यानं चटकन् आपल्याकडे खेंचून घेतले. ती जागच्या जागींच थबकली आणि एकदम उद्गारली, " अग बाई..."

इतक्या लवकर असा परिणाम होईल अशी उल्हासाची स्वतःचीही अपेक्षा नव्हती. तो मनांतल्या मनांत अतिशय आनंदून गेला; एवढंच नव्हे, पण हास्यभरानं भरून येणाऱ्या आपल्या गालांना आपल्या अभिनयाला साजेलसं वळण देतांना त्याला अगदीं पुरेवाट झाली. पण गंमत अशी कीं, इथंही त्याच्या सुदैवानं त्याला लागलाच हात दिला. हें वळण देण्याच्या प्रयत्नात त्याला जीं वेडीवांकडीं तोंडं करावीं लागलीं, त्यामुळं त्याच्या भूमिकेला अधिकच उठाव आला !

प्रमिला घाईघाईनं त्याच्याजवळ आली आणि घाबऱ्या घाबऱ्या म्हणाली, " अग बाई, अस काय करायचं तें ! "

उल्हासानं जाणलं, कीं आणीबाणीची वेळ ती हीच होय ! या वेळीं अभिनयांत किंचितही कसूर केली, कीं सारंच बिंग बाहेर फुटायचं ! अन् असा विचार करून प्रमिलेला उत्तर देण्याऐवजीं त्यानं चमत्कारिक डोळे करून तिच्या तोंडाकडे एक वेळ पाहिलं आणि मग दुप्पट जोरानं आपल्या आर्त सुरांना गळ्यावाटे वाट करून दिली !

आणि त्याच्या ह्या आर्त सुरांनीं पुन्हा आपली कामगिरी अगदीं चोखपणंच बजावली ! प्रमिलेचं तोंड रडवं झालेलं त्याला दिसलं. रुद्ध स्वरांत ती म्हणाली, " असं काय वेडयासारखं चालवलंय् हें ! चहा नाहीं घ्यायचा का ?"

या शब्दानीं उल्हासाला चहाची आठवण करून दिली, तरी त्यानं आपलं भान मुळींच जाऊं दिलं नाहीं. चहाचं विस्मरण त्याला झालेलं नव्हतंच. आणि आपल नाटक त्याला पुरं वठवायचं होतं, तरी आपल्या चहापानाच्या आड तें येईल अशी परिस्थिति निर्माण करायची त्याची मुळींच इच्छा नव्हती. यामुळं चहाची आठवण करून देतांच पांडुरंगाच्या नांवाचा गजर त्यानं कांहीं वेळ चालू ठेविला हें खरं, पण मग थोडया वेळानं डोळे उघडून चहाचा कप भक्तिभावपूर्वक त्यानं हातांत घेतला, दोन–तीनदां आळ्या-

कडे पाहून तो आपल्या कपाळाशीं लावला, नंतर त्यांतील थोडा चहा त्यानं बशींत ओतून ठेविला आणि मग बाकीचा घटांघटां पिऊन टाकला !

हें सारं करीत असतांना प्रमिलेच्या चेहऱ्याकडे त्यानं चोरून नजर ठेविली होतीच व त्यावर अपेक्षेप्रमाणंच उठत असलेले ते भाव पाहून त्याला गुदगुल्या होत होत्या. थोडक्यांत सांगायचं म्हणजे त्याच्या ह्या नाटकाचा पहिला अंक कल्पनेबाहेर यशस्वी ठरत चालला होता. आणि काय असेल तें असो, पण ही त्याची भूमिका जसजशी यशस्वी होत चालली, तसतशी ती पार पाडण्याला त्याला अधिक हुरूप तर आलाच, पण ती तशीच पुढं बराच वेळ चालविण्याचीही प्रबळ इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली आणि याचा परिणाम असा झाला, कीं प्रमिलेच्या केविलवाण्या चेहऱ्याकडे पाहून जेवणाच्यापूर्वी त्यानं ह्या नाटकावर जो कदाचित् पडदा पाडला असता, तो तसा न पाडतां पुरा एक दिवस तें चालू ठेवण्याचं ठरविलं.

पांडुरंगाची आळवणी केल्यानंतर विठाईची आळवणी करण्यास त्यानं सुरवात केली. अर्थात् तोंड व हात दमले, कीं डोळे मिटून या देवतांचं ध्यान करण्यास तो मुळींच कसूर करीत नसे. जेवणावर बसतांच त्याला 'आधीं बीज एकलें' या अभंगाची आठवण झाली, ( चहाप्रमाणंच जेवणावरही त्यानं बहिष्कार घातला नव्हता; ) जेऊन उठल्यानंतर त्यानं 'नाम घेतां उठाउठी' हाही अभंग म्हणून टाकला. आणि मग 'तुका झाला सांडा' हें पद त्याला म्हणावंसं वाटलं. हें पद, तो म्हणतो, आपण इतक्या कारुण्यपूर्ण रीतीनं म्हटलं, कीं प्रमिलेच्या डोळ्यांत एकदोन अश्रुही उभे राहिल्याचं त्याच्या चोरट्या नजरेला दिसून आलं. आणि हें पाहतांच आपली भूमिका पुरेपूर वठली याबद्दल त्याला शंकाच उरली नाहीं ! यामुळं एक प्रकारचं समाधान त्याला वाटूं लागलं आणि या समाधानाच्या भरांत तो आपल्या कॉटवर लवंडला व डोळे मिटून मनांतल्या मनांत तुकारामाचं कौतुक करूं लागला.

आणि थोडक्याच मिनिटांत त्याला अशी मजेदार झोंप लागली, कीं संध्याकाळचं ऊन खिडकींतून आंत येऊं लागलं होतं, तरीही तो त्या वेळीं

एका गंमतशीर स्वप्नांत गुंग होऊन गेला होता. प्रमिलेनं आपला अट्टा-हास सोडून आपली क्षमा मागितली व आपल्या बेताला संमति दिली असं दृश्य तो या स्वप्नांत पाहत होता; प्रमिलेनं आपला हेका सोडल्यानंतर आपणही आपलं सोंग कसं झुगारून दिलं व त्यानंतर लागलींच आपल्या बेतांना अनुसरून आपण ठरविलेल्या गांवीं दोघांनीं निघण्याची तयारी कशी केली; सारी तयारी झाल्यानंतर दारापुढं गाडीही येऊन कशी उभी राहिली, आणि धडधड जिना उतरून आपण कसे खालीं आलों—

ह्याच धडधडाटानं उल्हास अकस्मात् जागा झाला. जिन्यावर धडधडाट होत असल्याचं त्याला ऐकूं येत होतं हें खरंच; पण तो धडधडाट आपल्या पावलांचा नव्हता हें उमगून यायला त्याला क्षणाचाही विलंब लागला नाहीं; तो उठून बसला व दाराकडे त्यानं दृष्टि फेंकली आणि ती तिथं जाऊन पोचते न पोचते तोंच तें दार भाडकन् उघडलं गेलं आणि ' पमे, मीं आलों बरं का ! ' असे उद्गार काढीत एक व्यक्ति आंत घुसलेली त्याला दिसली.

ह्या व्यक्तीची ओळख पटवून देणारा संदेश व तिनं काढलेले उद्गार हीं दोन्ही ज्या क्षणीं उल्हासच्या मेंदूकडे जाऊन थडकलीं, त्याच क्षणीं तिथून उलट बाजूनं अनेक हुकुम बाहेर पडले. आणि ह्या हुकुमासरशीं उल्हास एकदम उद्गारला, " कशाला ? "

" ऑं ? " ती व्यक्तिही एकदम उद्गारली. उल्हासाच्या प्रश्नाचा तिच्या-वर मोठाच चमत्कारिक परिणाम झाल्यासारखा दिसला. कारण वरील उद्गार काढतांना आपल्या तोंडाला जो तिनं आकार दिला होता, तो बदलण्याचं कांहीं वेळ तिला स्मरणच राहिलं नाहीं !

शिष्टाचाराची उल्हासाइतकी मुर्वत धरणारा इसम दुसरा कुणीही नसेल; पण ज्या कोणा व्यक्तीचं आगमन या वेळीं होणं त्याला अगदींच रुचलं नसतं, अशीच ही व्यक्ति होती. ही व्यक्ति आंत आली, त्या वेळीं कुठून तरी एकाएकीं एका भल्या मोठ्या काळ्याकुट्ट ढगाची छाया आपल्या भोंवतालच्या आनंदी वातावरणावर एकदम पसरल्याचं त्याला दिसलं. तसं पाहिलं, तर प्रो. नानासाहेब चक्रदेव वर्णानं मुळींच काळे नव्हते; पण त्यांना

त्या क्षणीं पाहून उल्हासच्या डोक्यांत ही वरील कल्पना तत्काळ येऊन गेल्याशिवाय राहिली नाहीं, एवढं मात्र खरं !

तथापि आपला प्रश्न शिष्टाचाराला सोडून झाला हें लक्षांत येऊन तो सुधारून घेण्यासाठीं तो लगेंच म्हणाला, " नाहीं म्हटलं, आपलं येणं कां झालं ?"

" माझं येणं ?—"

" हं—"

" कां झालं ! "

" हो ! "

" मीं कां आलों असं विचारतां आहां तुम्ही ? "

आपला प्रश्न प्रोफेसरसाहेबांना नीटसा कळला नसेल असा तर्क करून उल्हासानं किंचित् चढया सुरांत उत्तर केलं, "होय, तेंच विचारतों आहें मीं !"

" मीं कां आलों हें ?—"

" होय—"

" म्हणजे मी इथं यायचं कारण काय, असा तुमच्या विचारण्याचा हेतु होय ? "

" होय, होय, होय,—" उल्हासाला आतां आपल्या मनाची समतोलता कायम राखणं कठीण होऊं लागलं होतं.

" आश्चर्य आहे ! " प्रोफेसरसाहेब पुन्हा चमत्कारिक चेहरा करून उद्गारले, " मीं कां आलों असं तुम्ही विचारावं ! आश्चर्य आहे ! "

" आश्चर्य कसलं, बोडक्याचं ! सरळ प्रश्नाला उत्तरं द्यायचीं नाहींत—" उल्हास दांतांवर दांत दाबून तोंडांतल्या तोंडांत पुटपुटला. त्याच्या मनाचा तोल आतां पार सुटत चालला होता. म्हातान्यानं काय हा फाजलपणा चालविला आहे असं त्याला वाटूं लागलं.

" अं ! काय म्हणालांत ? " प्रोफेसरसाहेबांनीं विचारलं.

पण त्यांच्या प्रश्नाला उत्तर मिळण्यापूर्वी तिसरी एक व्यक्ति त्याच वेळीं तिथं उपस्थित झाली. त्या व्यक्तीनं उल्हासाकडे न पाहतांच सरळ प्रोफेसरसाहेबांकडे धांव घेतली आणि ती उद्गारली,

" अय्या ! आलांत बाबा ? सारखी वाट पाहतें आहें मी तुमची—"

" आलों बरं पमे, एक दोन मिनिटंच झालीं असतील मला येऊन ! तुझी तार हातांत पडतांक्षणींच उठलों, गाडी गांठली, अन् धांवत आलों हा !"

" तार ? " उल्हास ओरडला.

" हो तार ! तुम्हांला ठाउक नाहीं ? "

" त्यांना नाहीं ठाऊक, बाबा ! " प्रोफेसरसाहेबांच्या पमीनं मध्येंच उत्तर केलं, " मींच पाठविली तुम्हांला ती घाईघाईनं ! बरं झालं बाई तावडतोब आलांत तें ? सकाळपासून कशी सारखी घाबरून गेलें आहें मी ! "

" घाबरून गेली आहेस ? " प्रोफेसरसाहेब गडबडीनं म्हणाले, " अरे, अरे ? एवढं काय झालं बरं ? प्रकृति—"

" प्रकृति नाहीं बाबा ! पण सकाळपासून वेडयासारखं चालवलंय् ! तेव्हां —"

" वेडयासारखं ? " प्रोफेसरसाहेब मध्येंच ओरडले.

" हं, वेडयासारखंच ! एकाएकीं आज सकाळपासून काय झालं कुणाला ठाऊक—"

" पमे, पोरी, वेडयासारखं चालवलं आहे म्हणतेस ? कुणी ? कुणी ?—"

" आणखी कुणी बाबा ? तिसरं कुणी माणूस आहे का घरांत आमच्या ?—"

" म्हणजे उल्हासरावांनीं म्हणतेस तूं ? "

" होय बाबा ! सकाळीं सारखं विठाई विठाई करायला लागले, तेव्हां ती आमची भाजीवाली देखील घाबरून गेली; म्हणाली, ' अगो बया ! माझ्या नांवानं कोण ग बया गागतीया ! ' तेव्हां काय करूं ? लगेच तार केली, बाबा तुम्हाला ! "

" अरे, अरे ! तरीच हं–तरीच !" प्रोफेसरसाहेब कांहीं तरी आठवल्यासारखं करीत उद्गारले.

" तरीच काय, बाबा ? "

" कांहीं नाहीं ! मघां मी आलों, त्या वेळीं मोठे चमत्कारिक प्रश्न केले यांनीं मला ! "

" अग बाई, खरं का हें ? " प्रमिला किंचाळून म्हणाली, " आई गऽ आतां काय करायचं ? मला वाटलं होतं—"

उल्हासला आपल्या वेडयाच्या भूमिकेची या वेळीं आठवण झालीच होती आणि त्याबरोबरच प्रकरण जरा भलत्याच दिशेला जाऊं लागलं आहे, हेंही त्याच्या लक्षांत येऊन चुकलं होतं. या प्रसंगीं कोणतं धोरण स्वीकारावं याचा तो विचार करीत होता; इतक्यांतच प्रमिलेच्या तोंडचे ते उद्गार ऐकून तो भान न राहून एकदम ओरडला, " काय ? काय वाटलं तुला ? "

वास्तविक आपली भूमिका कितपत यशस्वी ठरली हें जाणून घ्यायच्या उत्सुकतेनंच उल्हासनं हा प्रश्न केला होता, पण दुर्दैवानं ते शब्द त्याच्या तोंडून अशा स्वरांत उच्चारले गेले, कीं प्रमिला दचकून दोन पावलं मागंच सरकली आणि रडव्या स्वरांत उद्गारली, " अग बाई—खरंच अं, बाबा ! मला वाटलं होतं, झोंप लागली म्हणजे डोकं जरा उतरेल—पण हें अधिकच होत चाललं ! आतां काय करायचं बाई ?—"

" हं, आतां आलं लक्षांत माझ्या सारं ! " प्रोफेसरसाहेब विचार करीत म्हणाले, " बरं का पमे, आश्चर्य वाटलं मला पहिल्यांदा—कालच तुझं पत्र आलं होतं, कीं दोघंही निघून येतों म्हणून, अन् लगेच ही आज तार येते म्हणजे काय ?—हं, आतां बरोबर ! "

" अं ! पत्र पाठवलं होतंस तूं ? " उल्हास पुन्हा ओरडला.

प्रोफेसरसाहेब त्याच्याकडे पाहून पण आपल्या लेकीला उद्देशून म्हणाले, " आणि बरं का पमे, मी म्हणतों, आतां आपण असंच करूं ! उद्यांच्या गाडीनं निघूं आपण ! तसं कांहीं विशेषसं मला दिसत नाहीं ! जरा मोकळ्या थंड हवेंत गेल्यावर कसं लागलीच छान वाटेल अगदीं यांना. आपल्या चांदगांवची हवा किती सुंदर असते या दिवसांत—"

तापलेल्या सळईप्रमाणं कानांत शब्द कसे घुसतात हें उल्हासानं त्या वेळे-पर्यंत फक्त कथाकादंबऱ्यांतूनच तेवढं वाचलं होतं, पण या वेळीं त्याला

म्हणे, त्याचा प्रत्यक्षच अनुभव आला. ती सळई त्याच्या कानांत घुसतांच तो किंचाळून ओरडला, " डॅम् दॅट् हवा ! "

" डॅम् दॅट् हवा ? "

" यस्, डॅम् इट ! "

" अरे, अरे, अरे ! " प्रोफेसरसाहेब म्हणाले, " तुम्हांला बिलकुल अनुभव नाहीं म्हणून वाटतंय् तुम्हांला असं ! चार दिवस आलां होतां त्यानं कसं कळणार ! अन् शिवाय त्या वेळीं पावसाळा होता, आतां आहे उन्हाळ्याची सुरवात ! या वेळीं किती छान वाटतं तिकडे ! बरं का पमे, माझी अगदीं पुरी खात्री आहे, कीं उल्हासांच्या डोक्याला आपल्या गांवच्या हवेची झुळुक लागली, की चटसारं उतरतंय् डोकं ! "

" मलाही तसंच वाटतं बाबा ! " लेकीनं त्यांना लगेच दुजोरा दिला, " मीं म्हणतें, लवकर जाऊं तेवढं बरं ! "

" ओ नो— " उल्हास ठासून म्हणाला, " इट वोन्ट डू ! "

" नाहीं, नाहीं, तुम्हाला याच असं म्हणत नाहीं मीं— पण पण तें तें आपण उद्यां पाहूं- बरं का पमे ! " प्रोफेसरसाहेब लेकीकडे वळून पुढं म्हणाले, " काय झालं आहे, ठाऊक आहे तुला ? मीं यांना आमच्या साऱ्या टेस्ट्स् लावून पाहिल्या— "

" टेस्ट्स्, बाबा ? "

" हं, टेस्ट्स् ! आमच्या सायकॉलजींत सांगितलेल्या टेस्टस् लावून पाहत होतों मी आतांपर्यंत !— झाली आहे काय गंमत, कीं बाकी साऱ्या टेस्ट्स्ना नॉर्मल उत्तरं मिळताहेत, पण सेन्स ऑफ ह्यूमर कमी झाला आहे,—जवळ जवळ नाहींच म्हटलं तरी चालेल, अन् याला उपाय— "

" उपाय बी ब्लोड ! " उल्हास एकदम ओरडला.

" पाहिलंस ?—" प्रोफेसरसाहेब लागलीच म्हणाले, " सेन्स ऑफ ह्यूमर कमी झाल्याचं हें मोठं चिन्ह ! त्याला उपाय म्हणजे या इथून—या मुंबईतून तावडतोब बाहेर कुठं तरी थंड हवेंत जायचं हाच ! मीं अशीं पुष्कळ उदाहरणं पाहिलीं आहेत—साहजिकच आहे म्हणा हें ! या मुंबईच्या वातावरणांत

मनुष्य सहजच चिडखोर बनत जातो !—तेव्हां उद्यां निघायचं हें ठरलंच ! ”

“ होय बाबा ! ”

“ होय बाबा नाहीं ! ” अधरोष्ठ चावून उल्हास एकदम गरजला.

पण प्रोफेसरसाहेब चटकन् म्हणाले,

“ तें, तें, आपण उद्यां पाहूं बरं ! उद्यां पाहूं ! अन् बरं का पमे, ” ते पुढं म्हणाले, “ एक केलं पाहिजे, तें हें कीं यांच्याशीं आतां चांदगांवला पोंचेपर्यंत फारसं बोलायचं नाहीं ! बोलण्यानं काय होतं, कीं चिडखोरपणा अधिक वाढतो, अन् चिडखोरपणा वाढला, कीं डोक्यावर त्याचा परिणाम झालाच ! तेव्हां आलं लक्षांत ?—फारसं बोलायचं नाहीं—”

“ होय बाबा ! ” त्या आज्ञाधारक मुलीनं उल्हासाकडे पाहत गंभीरपणं मान हालविली.

आणि हें संभाषण संपल्यानंतर उल्हासाची जी केविलवाणी स्थिति झाली, तशी, तो म्हणतो कीं, भर वर्गांत एकदां त्याच्या गणिताच्या प्रोफेसरानं एक तासभर त्याला फळ्याकडे उभं करून त्याच्याकडून एक उदाहरण सोडवून घेतलं होतं ( किंवा सोडवून घ्यायचा प्रयत्न केलेला होता, असं म्हटल्यास अधिक शोभेल ) त्या वेळींही झाली नव्हती ! अशा चमत्कारिक व्युहांत तो सांपडला होता, कीं त्यांतून सुटायचा जो जो मार्ग तो दृष्टीपुढं आणी, त्या त्या प्रत्येक मार्गांत कांहींना कांहीं अडचण त्याला दिसून आल्यावांचून राहत नव्हती. श्वशुरांची नजर चुकवून तिथून काढता पाय घ्यावा असाही विचार त्यानं एक वेळ केला. पण म्हाताऱ्याच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटणं किती कठीण होतं हें त्याच्या प्रत्ययाला यायला उशीर लागला नाहीं. कारण, श्वशुरांच्या नजरेखालीं फार वेळ बसणं असह्य झालं, तेव्हां पाय मोकळे करून यावे अशा उद्देशानं त्यानं पोषाख चढविला, तों काय दुर्दैव ! श्वशुरांनींही तत्काळ आपलंच अनुकरण करायची सिद्धता चालवल्याचं त्याला आढळून आलं. निरुपायानं त्यानं

अंगावर चढविलेला कोट उतरून ठेविला, आणि तो आंतल्या खोलींत गेला. तिथं त्याची हृदयस्वामिनी होती. पण साऱ्या जन्मांत बापाची आज्ञा जितक्या तत्परतेनं तिनं पाळली नसेल, तितक्या तत्परतेनं त्या दिवशीं ती पाळायचा तिनं निश्चय केला होता असंच त्याला दिसून आलं !

आपण कोमलहृदयी म्हणून समजत असलेली स्त्रीजात किती कठोर आहे याची त्याला त्या वेळीं पहिल्यानं जाणीव झाली. 'अग बाई' असा एकादा चुकार उद्गार काढण्यापलीकडे त्या पोरीनं त्याच्याशीं एक अक्षरही बोलायचं नाकारलं. आणि तिचं सहकार्य मिळवण्याचा त्यानं जो प्रयत्न केला, त्याचा अखेरीला उलट असा परिणाम झाला, कीं तो बाहेर येऊन हताश होऊन आरामखुर्चीवर पडला असेल नसेल तोंच प्रमिलेनं बाहेर येऊन प्रोफेसरसाहेबांना हांक मारून म्हटलं, "मीं म्हणतें, बाबा, कीं आज रात्रींच आपण निघायचा बेत केला तर कसं ?"

"अँ ?" हा उद्गार उल्हासनं दचकून काढला होता; पण त्याच्या उद्गाराकडे लक्ष न द्यायचं आपलं धोरण कायम ठेवून प्रोफेसरसाहेब म्हणाले,

"माझी ना नाहीं, पमे,—नव्हे, मीही तेंच म्हणणार होतों; पण म्हटलं तुमची तयारी व्हायला जरा वेळ लागेल !"

"अंहं-तयारी मीं दुपारींच केली आहे !"

"अच्छा ! मग बरंच झालं तर ! कारण माझे एक मित्र यायचे आहेत तिकडे, तेव्हां ते येण्यापूर्वी मला पोंचतां आलं तर उत्तमच झालं—"

उल्हासच्या अंतःकरणांत या उद्गारांनीं भयंकर खळबळ उडवून दिली. सकाळपर्यंत कांहीं तरी उपाय शोधून काढायला त्याला अवधि मिळाला असता, तो या नव्या बेतामुळं नाहींसा झाला होता ! पण अगदीं ऐन याच वेळीं उल्हासाच्या तल्लख डोक्यांतून एक सुरेख कल्पना चमकून गेली आणि आतांपर्यंतचा आपला नूर एकदम बदलून खो खो हंसून तो म्हणाला, "असं पाहा !"

त्याच्या हास्यानं प्रोफेसरसाहेब एकदम ताठ होऊन उद्गारले, "अँ—"

"नाहीं, मी असं म्हणतों कीं प्रवासाचा त्रास झाला आहे तुम्हांला—"

" प्रवासाचा त्रास ? "

" हो, प्रवासाचा त्रास झाला असेल तुम्हांला, तेव्हां उद्यां सकाळपर्यंत विश्रांति घ्यायला काय हरकत आहे ? "

" छत्- "

" ऑं ?- "

" प्रवासाचा कसला आला आहे त्रास ! "

" अं ? झाला नाहीं ?— "

" छे, हा कसला प्रवास ! सारा दोन–अडीच तासांचा ! त्याला काय प्रवास म्हणायचं ! "

आपला बाण अचूक लागू पडेल अशी उल्हासची जी अपेक्षा होती, ती आतां पार मावळत चालली. तरी शेवटचा एक प्रयत्न करावा म्हणून तोंडावर हसूं आणून तो म्हणाला, " तें खरं–पण असं पाहा— "

परंतु प्रोफेसरसाहेब त्याला बोलूं न देतां चटकन् म्हणाले,

" दॅट्स् ऑल राइट ! आय अम रीयली ग्लॅड टू सी दॅट यू आर इम्प्रूव्हिंग–अन् म्हणूनच मी म्हणतों, शक्य तितकं लवकर गेलं कीं ही सुधारणा अधिक जलद होईल ! "

या शब्दांनीं उल्हासला आतां निराशेच्या गर्तेत साफच लोटून दिलं. एका दगडानं दोन पक्षी मारायचा त्यानं बेत केला होता. आपल्या हास्य-मुद्रेनं ' सेन्स ऑफ ह्यूमर ' आपल्यामध्यें भरपूर आहे, हें तो पटवून देणार होता. आणि ही त्याची क्लृप्ति यशस्वी झाली असती, कीं आवश्यक तो वेळही त्याला मिळाला असता ! पण दैव या वेळीं त्याच्यावर अगदीं पुरतं उलटलं होतं आणि वरील शब्दांनीं त्याच्या मनावर अशी प्रतिक्रिया घडवून आणली, कीं तो एकदम कडाडला, " डॅम् दॅट इम्प्रूव्हमेंट ! "

" ऑं ? "

" डॅम् इट आय् से ! "

प्रोफेसरसाहेब चमकल्यासारखे झाले. ते म्हणाले, " बरं का पमे, आजच निघूं आपण ! ही लहर कांहीं अद्यापि सोडीत नाहीं यांना ! "

उंटावरील ओझ्यांत शेवटची काडी पडावी, तसाच परिणाम या शेवटच्या प्रसंगानं उल्हासाच्या मनावर झाला. पिंजऱ्यांत सांपडलेल्या वाघाची कशी स्थिति होत असेल याची पुरी कल्पना, तो म्हणतो, त्या वेळीं आपल्याला झाली. अर्थात् पिंजऱ्यांतल्या वाघाप्रमाणं तो गुरगुरतही नव्हता, अथवा आपल्या त्या खोलींत येराझाराही घालीत नव्हता. मनांतल्या मनांत मात्र तो प्रोफेसरसाहेबांवर व त्यांच्या त्या 'दिव्य' (हेंच विशेषण त्या वेळीं प्रमिलेला लावावंसं त्याला वाटलं होतं.) लेकीवर भयंकर संतापून गेला होता. प्रोफेसरसाहेबांना तर त्यानं 'लुच्चा बोका' असंही म्हणायला कमी केलं नाहीं. अर्थात् हें सर्व त्यानं स्वगतच म्हटलं; पण इतर तरुणां-प्रमाणं तो अविचारी नसल्यामुळं त्यानं हे आपले स्वगत बोल उघड तर केले नाहींतच, पण शिवाय 'दम धरा व वाट पाहा' हेंच धोरण कांहीं वेळ पत्करायचं ठरवून आपले नाखुष असलेले पायही त्यानं ११-५० च्या गाडीकडे मोठ्या सक्तीनं कां होईना, पण अखेरीस वळवलेच !

पण त्याच्या मनातलं विचारचक्र मात्र मुळींच थांबलं नव्हतं. गाडींत चढतांना तें दुप्पट जोरानं फिरूं लागलं. ह्या विचारचक्रानं त्याच्या डोक्यांत अशा तऱ्हेचं थैमान सुरू केलं, कीं त्यापुढ गाडीचाही खडखडाट त्याच्या कानांना ऐकूं येईना ! चांदगांवच्या स्टेशनवर गाडी येऊन उभी राहिली आणि मिळालेल्या सूचनेनुसार तो यंत्राप्रमाणं खालीं उतरला, तरी ह्याच चक्रांत तो गरगर फिरत होता; पण तो खालीं उतरून एकदोन पावलं गेला असेल नसेल, तोंच ह्या चक्राला एकदम खाड्दिशीं 'ब्रेक' लागल्याचा भास त्याला झाला; आणि हा 'ब्रेक' कां लागला याचं संशोधन करण्यासाठीं ज्या वेळीं त्याची दृष्टि बाजूला वळली, त्या वेळीं एक भला मोठा बोजा आपल्या अंगावर आदळल्याचं त्याला समजून आलं !

आणि यानंतर मग ह्या बोजाचं स्वरूप थेट मनुष्याकृतीसारखंच आहे हेंही कळून येण्यास त्याला क्षणाचाही अवधि लागला नाहीं. इतर वेळीं अशा प्रसंगीं उल्हासानं 'माफ करा' असे शब्द उच्चारण्यापलीकडं

कांहीं केलं नसतं, अथवा फार तर च् च् हे उद्गार काढून अन् धक्का देणाऱ्या व्यक्तीकडे रागानं पाहून कोटाची विस्कटलेली घडी सारखी करीत मार्ग सुधारला असता. पण या वेळीं चमत्कार असा झाला कीं, त्याचे पाय त्या बोजामागोमाग त्वरेनं धांव घेऊं लागले. त्याच्या पायाची व त्या बोजाच्या पार्श्वभागाची मोठ्या दणक्यानं गांठ पडली आणि मग क्षणभऱ्यांतच उल्हासाच्या समोरचा तो बोजा उभा होता तो आडवा झाल्याचं दिसून आलं!

पण ह्या स्थितींत तो बोजा फार वेळ मात्र राहिला नाहीं; बुडाला शिसं लावलेल्या जपानी बाहुल्याप्रमाणं त्यानं चटकन् उसळी मारली. त्याच वेळीं चांदगांव स्टेशनवरील मिणमिणणाऱ्या दिव्याचे किरण त्या आकृतीच्या चेहऱ्यावर पडले आणि तत्क्षणींच उल्हासच्या मागं या वेळीं येऊन पोंचलेले प्रोफेसरसाहेब एकदम ओरडले, "ओऽ!"

या उद्गारानं त्या व्यक्तीची दृष्टि उल्हासावरून प्रोफेसरसाहेबांकडे वळली आणि मग तीही ओरडली, "ओऽ!"

"मोठा मजेदारच योगायोग, नाहीं का हा?—"

"मजेदार?—" ती व्यक्ति उल्हासाकडे पाहत उद्गारली.

"मजेदार म्हणजे चमत्कारिक!" प्रोफेसरसाहेब म्हणाले, "गंमत काय झाली कीं, तुमच्या येण्याची मी वाट पाहत बसलों होतों. तोंच मुंबईला अकस्मातच जाणं भाग पडलं—तसं कांहीं मोठं कारण नव्हतं म्हणा! आमचे हे जामात—"

"तुमचे जामात हे?" उल्हासाकडे पुन्हा एक वेळ न्याहाळून पाहून त्या व्यक्तीनं विचारलं.

"हो, लेट मीं इन्ट्रोडयुस हिम टू यू—हे आमचे जामात उल्हास देशमुख अन् ही माझी मुलगी प्रमिला, अन् बरं का उल्हासराव—" प्रोफेसरसाहेब उल्हासकडे वळून म्हणाले, "हे माझे मित्र प्रो. चूडामणि, जबलपुरचं नवीन कॉलेज निघतंय्, त्याचे प्रिन्सिपल!"

"अं?" उल्हास चमकून उद्गारला. त्याला सकाळपासून इतके

धक्के बसत होते, पण त्या सर्वांपेक्षां हा आतांचा धक्का अधिकच मोठा होता; जबलपूरच्या त्या नव्या कॉलेजमध्यें प्रोफेसरची जागा मिळण्यासाठीं त्यानं अर्ज केला होता. आणि त्या अर्जाला अनुकूल उत्तर मिळण्याची त्याची आशा, नुक्ताच जो प्रसंग घडून आला होता, त्यामुळं बहुतेक दुरावल्यासारखीच झाली होती. तथापि उल्हास प्रयत्नवादी होता. तो लगेच म्हणाला,

" ओ ऽ एक्स्क्यूज् हं ! मी—मी—मी—"

पण प्रो. चूडामणि गालावर दोन सुरकुत्या पाडीत म्हणाले,

" उं ! इट्स् नथिंग—"

" नथिंग ?— " उल्हासाला आणखी एक नवीन धक्का बसला !

" हं;—उलट मला तुमचा तो ' स्पिरिटेड ॲटॅक ' फार आवडला !—"

" स्पिरिटेड ॲटक ? "

" यस् इंडीड !—अशाच स्पिरिटचीं माणसं पाहिजेत आतांशा ! नाहीं तर आतांची तरुण मंडळी मी पाहतों तीं ख्रिस्ताचंच अनुकरण करायला एका पायावर तयार असतात. मला हे लोक मुळींच आवडत नाहींत. प्रोफेसरसाहेबांचंही मत तसंच आहे ! खरं कीं नाहीं मी म्हणतों ते मि. चक्रदेव ?—"

" हो, " प्रोफेसरसाहेब म्हणाले, " गंमत काय झाली कीं,—"

" पण तुम्ही या तुमच्या जामाताबद्दल आतांपर्यंत केव्हांच कांहीं बोललां नाहींत !—"

" तेंच सांगत होतों मी–गंमत काय झाली, कीं आमचे हे उल्हासराव जरासे आहेत भिडस्त–अन् भिडस्त इसमांचं न् तुमचं पटत नाहीं हें मला ठाऊक होतं, तेव्हां—"

" नॉट् ॲट् ऑल्–" प्रो. चूडामणि मध्येंच हंसून म्हणाले, " या ठिकाणीं तुमचं–आमचं मत जुळूं शकत नाहीं मि. चक्रदेव ! सासरे म्हणून तुमच्याकडे ते जरा भिडस्तपणं वागत असतील; पण मीं जी एका मिनिटांत परीक्षा केली, त्यावरून मला तसं मुळींच वाटत नाहीं, अन् माझी परीक्षा

केव्हांच चुकलेली नाहीं आतांपर्यंत ! खरं कीं नाहीं मी म्हणतों तें—मिस्टर—मिस्टंर—"

" देशमुख–उल्हास देशमुख–" प्रोफेसरसाहेबांनीं सुचविलं.

" हं देशमुख—खरं कीं नाहीं, मीं म्हणतों तें मि. देशमुख ! बाय् ध वे तुमचं नांव मी कुठं तरी ऐकलंय् यापूर्वी–कुठं बरं ?—पाहा हं— "

" ऐकलं नसावं–पाहिलं असेल ! " उल्हास मध्येंच पुटपुटला.

" एक्झॅक्टली–ऐकलंय् नाहीं, पाहिलंय्–वाचलंय् कुठंसं ! " डोक्यावर ठेवलेलं बोट तिथंच एकदोन वेळ दाबून प्रो. चूडामणि चटकन् उद्गारले, " हं, आठवलं पाहा—उल्हास देशमुख या नांवानं अर्ज आला आहे एक आमच्याकडे—मला वाटतं तो तुमचाच असेल ! "

" हूं. "

" हं तुमचाच असावा तो! " प्रो. चूडामणि पुढं म्हणाले, " अन् नसला तरी तुम्ही आमचे एक ' कलीग ' व्हावं अशी माझी विनंती आहे तुम्हाला ! काय मान्य आहे का आमची ही विनंती ? "

" विनंती ? " उल्हासाला पुन्हा एक जोराचा धक्का बसला ! पण आतांच्या ह्या धक्यामुळं त्याचं मन विस्मयानंच नव्हे, पण आनंदानं नाचूं लागलं.

" हं; कां ? मान्य नाहीं ? " प्रो. चुडामणींनीं विचारलं.

उल्हास गडबडीनं उत्तरला,

" नाहीं, तसं नाहीं; मान्य आहे–मान्य कां नसणार ? "

यानंतर उल्हास म्हणतो, कीं त्या वेळपर्यंत त्याची जी खिन्न वृत्ति होती, ती केव्हांच मावळून गेली तें त्याला समजलं सुद्धां नाहीं ! आपली आदल्या दिवशींची भूमिका तो साफ विसरून गेला; मात्र राहून राहून त्याला एका गोष्टीचं फार नवल वाटूं लागलं होतं. ही गोष्ट अशी कीं त्याच्याचप्रमाणं प्रोफेसरसाहेबांना व प्रमिलेलाही त्याच्या त्या भूमिकेचा विसर पडला होता !

त्यांना हा असा विसर पडलेला पाहून उल्हासला एकापरी बरंच वाटलं. तथापि त्यांच्या झालेल्या गैरसमजाचं आपल्या बाजूनं निराकरण करणं अवश्यच आहे असंही त्याला वाटूं लागलं. कारण झालेली गैरसमजूत तशीच राहूं दिली, तर एखाद वेळीं पुढंमागं भलताच अनवस्था प्रसंग ओढवायचा, असा विचार त्याच्या पोक्त मनानं केला. आणि यामुळं ज्या वेळीं त्याची अन् प्रमिलेची प्रोफेसरसाहेबांच्या घरामागच्या बागेत कांहीं वेळानं गांठ पडण्याचा योग आला, त्या वेळीं त्यानं तिला हंसत म्हटलं, " छान फसलीस हं काल तूं ! "

ती पोरगीही मिस्किलपणं हंसली आणि उत्तरली, " फसलें मी ? "

" हो, कालचं माझं सारं सोंग होतं तें ! "

" मग कोण म्हणतं, नव्हतं म्हणून ? "

" म्हणजे ? तुला ठाऊक होतं ? "

" ठाऊक झालं. "

" ठाऊक झालं ? "

" मग न व्हायला काय झालं ? निदान सोंग घ्यायचं तें तरी चांगलं वठवायचं होतं ! "

" अं ? म्हणजे ? "

" म्हणजे असं, कीं तुकारामाचं वेड लागलेलं माणूस चोरट्या नजरेनं आजूबाजूला पाहत नसतं ! बाकी तुमच्यापेक्षां माझीच भूमिका अधिक सरस वठली म्हणायची ! "

" तुझी भूमिका ? " आश्चर्यानं उल्हास ओरडला.

प्रमिला हंसून म्हणाली,

" हो. मीं फसलें असं तुम्हांला अजूनपर्यंत वाटत नव्हतं का ? हीच माझी भूमिका यशस्वी झाल्याची साक्ष ! दुसऱ्याला चकवतांना स्वतःच एखादं माणूस फसतं तें हें असं ! "

" मग तूं नानासाहेबांना तार करून बोलावलंस तेंही–"

" तार करून बोलावलं हें खरंच; पण तें तुकारामाच्या वेडाला

घाबरलें म्हणून मात्र मुळींच नव्हे; बाबांना बोलावलं कीं वेडही उतरेल अन् इथं चांदगांवला यायचंही सहज जमून येईल असं मीं अनुमान केलं अन् माझी मात्रा किती लागू पडली हें दिसतंच आहे. ”

असं म्हणून ती मोठमोठ्यानं हंसूं लागली.

नंतर ती पुढें म्हणाली,

“ अन् बाबाही चकले माझ्या अभिनयाला !—त्यांना खरंच वाटतंय, चांदगांवच्या हवेनं आपल्यांत फरक पडला म्हणून– बाकी फरक पडला हें कांहीं खोटं नव्हे. ”

“ फरक पडला ? ”

“ हो ना ! मास्तराचं प्रोफेसरांत रूपांतर झालं हा फरक नव्हे का ? कां ? कशी आहे आमच्या चांदगांवची हवा ? ”

उल्हास हंसून उद्गारला,

“ वाऽ छान ! नाइस ! एक्सलंट ! ”

## शामू !

" वच्छे, अग वच्छे !

" काय काकू ? " वत्सला धांवतच बाहेर आली.

" वच्छे, हें बघ बाई, मीं उद्यां चाललें आहें गांवाला. जांवईबापूंचं पत्र आलं आतांच निघून या म्हणून—तेव्हां मीं अन् दिनू दोघंही उद्यां पहा-टेच्या गाडीनं निघणार आहों.—"

" कां ? इतक्या तांतडीनंसं ? यमुताई अन् मुलं खुशाल आहेत ना ? "

" सारीं खुशाल आहेत ग ! " काकू किंचित् हंसून म्हणाल्या, " पण जांवईबापूंचा आज किती दिवस आग्रह चालला आहे या म्हणून. आज त्यांचं अगदीं निकडीचंच पत्र आलंय् ; दिनूलाही उद्यांपासनं रजा पडलीय. तेव्हां म्हटलं, त्याची सुटी संपेपर्यंत एक महिनाभर जाऊन यावं—तेव्हां तुला माझं एक काम सांगायला आलें आहें. करशील का कांहीं सांगितलं तर ? "

" हें काय बाई विचारणं ? नाहीं म्हटलंय् का काकू कधीं मीं तुम्हांला ? पण कसलं एवढं काम आहे तें ऐकूं द्या तर खरं—"

" तूं नाहीं म्हणायचीस नाहीं हें ठाऊक आहे ग मला ! म्हणूनच तर तुझ्याचकडे आलें मीं अगोदर अन् शिवाय म्हटलं, आमच्या शामूला तुझ्याइतकं काळजीपूर्वक कोण संभाळणार आहे ? "

" शामूला ? " वत्सलेनं भुंवया रुंदावल्या.

" हो ग बाई, त्याला कुठं नेऊं माझ्याबरोबर ? त्याला इथंच ठेवावा लागणार अन् आम्ही दोघंही गेल्यानंतर घरांत कुणीही नसणार! तेव्हां प्रश्न पडला, शामूची सोय कशी लावायची ? असा मीं विचार करतें आहें तितक्यांत तूं आजच सकाळीं आल्याची आठवण झाली; अन् म्हटलं, आतां वच्छी आली आहे—आतां मुळींच नको काळजी करायला ! मग काय, करशील ना शामूची सोय एक महिनाभर तुझ्याकडे ? "

" हात्तिच्या ! त्यांत काय एवढं विचारायला पाहिजे होतं हो, काकू ? आम्ही जेवतोंखातों आहोंच ना ! त्यांतच तोही जेवील कीं—"

" छी; छी; छी; भात नाहीं हो मुळींच चालत त्याला, " काकू मानेला एक हिसका देऊन, म्हणाल्या, " अगदीं मुळींच तोंड लावायचा नाहीं भाताला. दूध-भाकरी एवढं मिळालं कीं स्वारी खूष ! मग सारा दिवस बाहेरच्या खोक्यावर पडून राहील ! बरीक कुरमुरे मात्र थोडेसे दोन प्रहरचे पाहिजेत त्याला-अशी बघत काय राहिलीस वच्छे, माझ्याकडे ! आश्चर्य का वाटलं तुला ? माजरं कुरमुरे खात नाहींत असं वाटलं होय तुला ? "

" अग बाई, मग शामू–"

" हो ग बाई ! इतर माजरं नसतील खात कुरमुरे, पण शामूला अगदीं पाहिजेतच हो ते दरदिवशीं ! " वत्सलेचं तोंड पुरतं उघडण्यापूर्वीच काकू लगेच पुढं म्हणाल्या, " दिनूनं केलीय ही संवय त्याला-चांगले एका पैशाचे कुरमुरे हवेत बघ ! पण बाकी एवढं झालं, कीं त्याचा त्रास नाहीं अगदीं कसलाच ! सकाळसंध्याकाळ नवटांक दूध, जेवणाच्या वेळीं थोडीशी दूधभाकर अन् मधल्या वेळेला थोडे कुरमुरे-इतकं त्याला घातलंस, कीं मग अगदीं बघायला नको ! मग काय ? ठेवून जाऊं ना मीं शामूला तुझ्याजवळ ? "

काकूंच्या बोलण्याला खंड पडतांच वत्सला हंसून म्हणाली,

" हो, बेशक-मला काय वाटलं काकू, कीं तुमचा शामू म्हणजे कुणी तरी मुलगा असेल अन् हा नवीन मुलगा तुमच्याकडे केव्हां आला याबद्दलच्या बुचकळ्यांत पडलें होतें हो मी—"

" तसंही का म्हणेनास, बच्छे ! शामू मला अगदीं मुलासारखाचा आहे हो ! तूं त्याला पाहिला नाहींस. कसं अगदीं गोजिरवाणं पोर आहे ! अन् समजूतही किती ! बाहेरच्या खोक्यावर मीं त्याला जागा नेमून दिली आहे, तिथं स्वारी कधीं दिसली नाहीं असं व्हायचंच नाहीं-तुला कसला म्हणजे कसला दिखील त्रास द्यायचा नाहीं तो-मग काय, जाऊं ना तुझ्यावर सोंपवून मी त्याला ? "

वत्सला मोठ्यानं हंसून उत्तरली,

" बाई, बाई, बाई-काकू, एवढाही नाहीं का येत विश्वास माझा तुम्हाला ? शामू तो काय एवढासा अन् मला त्याला संभाळतां येणार नाहीं असं वाटतं होय तुम्हांला ? "

" तसं नव्हे ग बच्छे, मला तुझा भरंवसा आहे ग ! पण माणसाचं मन वेडं असतं बघ ! तें जाऊंद्या म्हणा,-तूं आतां एवढं सांगितलंस तेव्हां निर्धास्तपणीं जायला हरकत नाहीं मला-जाऊं मी आतां ?-उद्यां पहांटेच्या सुमाराला आम्ही निघूं इथून, तेव्हां मी आणून पोंचवीन त्याला, नाहीं तर तूंच ये खालीं त्याला घेऊन जायला. सावकाश चांगली सात-आठ वाजतां आलीस तरी हरकत नाहीं. शामू खोक्यावर बसलेला मिळेल तुला ! "

वत्सलेनं हास्य मुद्रेनं होकार देतांच काकूंनीं जाण्यासाठीं पाठ फिरविली. पण तितक्यांतच त्या पुन्हा वळून म्हणाल्या,

" शामूचं खाणंपिणं लक्षांत राहील ना तुझ्या ? दूध, भाकरी अन् कुरमुरे ! अन् हें बघ, मला आठवणच राहिली नव्हती त्याची-त्याच्या खर्चासाठीं हा रुपया घेऊन ठेव-पंधरा-वीस दिवस पुरेल त्याला तो- "

" हें काय काकू ? पैसे कशाला हवेत ? त्या मांजरीला कसला एवढा खर्च ? " वत्सलेनं हात मागं घेत म्हटलं.

काकूंना वत्सलेचे हे उद्गार रुचले नाहींत असं दिसलं. त्या मान हालवून म्हणाल्या, " वाऽग बाई ! इतर मांजरं नव्हत तीं, शामू आहे तो-त्याच्यासाठीं जादा खर्च करावा लागतो मला, अन् तुलाही तो पडणारच-अन्

हें बघ, व्यवहाराला माणसानं कसं अगदीं चोख असावं असं मला वाटतं ! चल, असं वेड्यासारखं करूं नये ! "—

असं म्हणून काकूंनीं वत्सलेचा हात घेऊन त्यांत आपल्या हातांतील रुपया बळेंच ठेवला आणि मग त्या हंसून म्हणाल्या, " वाटलं तर मीं परत येऊन हिशेब घेईन, त्या वेळीं तो खर्च झाला नाहीं तर माझा मला परत दे-येतें मीं आतां !-सकाळीं ये हो अगदीं जरूर !—"

आणि हा वरील संवाद ज्या दिवशीं संध्याकाळीं झाला, त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं सात वाजण्याच्या सुमारास राजाभाऊनं जागं होऊन अंथरुणावरून पडल्या पडल्याच डोळे किलकिले करून सभोंवार नजर फेकली, त्या वेळीं त्याला आपल्या खोलींत एका नवीनच प्राण्याचा प्रवेश झाल्याचं उमजून आलं !

राजाभाऊनं डोळे सताड उघडले व समोरच्या तिपाईवर बसलेल्या त्या प्राण्याकडे एक-दोन मिनिटं रोखून पाहिलं आणि मग त्या सकाळच्या थंडींत अंगावरून पांघरूण न काढण्याचा मोह होत असतांही तें झटकन् दूर सारून तो ताडदिशीं उठून बसला !

पुन्हा त्यानं त्या आगंतुक प्राण्याकडे डोळे फाडफाडून पाहिलं. नंतर एक झेंप घेऊन आपल्या पलंगापासून चार पावलांचं अंतर त्यानं तोडलं आणि खुंटीवर आडवी ठेवलेली आपली छडी घेऊन त्या प्राण्याकडे त्यानं आपला मोर्चा वळविला.

तो प्राणी राजाभाऊची ही प्रत्येक कृति अगदीं लक्षपूर्वक अवलोकन करीत होता. राजाभाऊनं त्याच्याजवळ जाऊन नीट पवित्रा घेतला, हातांतलं शस्त्र वर उगारलं आणि आतां तो घाव घालणार इतक्यांत—

—डोळ्यांचं पातं लवतं न लवतं तोंच त्या प्राण्यानं तिपाईवरून उडी घेतली ! पवित्रा राखून राजाभाऊनं चटकन् चार पावलं माघार घेतली आणि त्याच क्षणीं हां हां असा ध्वनि कुठूनसा त्याच्या कानावर येऊन आदळला !

राजाभाऊचे नेत्र त्या शब्दांच्या अनुरोधानं वळले. आणि तिथं त्याच्या दृष्टीला जें दृश्य पडलं, तें पाहून तो अगदीं थिजूनच गेल्यासारखा झाला !

ज्या प्राण्यावर हल्ला चढवायला त्याचे हात शिवशिवत होते, तो प्राणी आतां खुद्द त्याची प्रिय पत्नी वत्सला हिच्या नाजुक पण सुरक्षित हाताचा आसरा घेऊन त्याच्याकडे निर्भयपणं पाहत होता. आणि— आणि ती त्याची प्रिय पत्नी त्या प्राण्याला प्रेमानं गोंजारीत होती !

" बरं झालं बाई...! "

" बरं झालं ?—" आ वासलेल्या राजाभाऊच्या तोंडानं हालचाल केली !

" हो, ऐन वेळावर आलें म्हणून बरं झालं ! नाहीं तर शामूचा कपाळ-मोक्ष करून टाकला असतात, अन्—"

" शामू...? "

" हं, शामू—हा काकूचा शामू—"

" काकूचा शामू ?..." राजाभाऊनं भुंवया आकुंचित केल्या !

" हो, काकूचाच शामू—नाहीं तर कुणाचा ? त्याचा कपाळमोक्ष करून टाकला असतात, अन् मग मला काकूंना तोंड दाखवायला जागा राहिली नसती—"

" काकूचा शामू म्हणजे हा—"

" म्हणजे हा शामू—" शामूच्या पाठीवरून हात फिरवीत वत्सलेनं म्हटलं, " ह्याचं नांव शामू बरं का ! काकू—आमच्या गांवच्या काकू इथं खालच्या ब्लॉकमध्यें राहतात—माहित असतील आपल्याला, त्या आज पहांटे गांवीं गेल्या अन् आतां त्या येईतों शामू इथंच राहणार आहे—"

" हरे राम ! इथं म्हणजे ? "

" इथं म्हणजे आमच्या घरीं–कां बरं ? एवढं त्यांनीं सांगितलं अन् आपण नाहीं म्हणायचं हें बरं दिसेना, तेव्हां मीं म्हटलं बेशक ठेवा शामूला इथं ! "

" इथं बेशक ठेवा ?—हरे राम !—"

" इश्श ! हें काय असं हरे राम हरे राम सारखं म्हणायचं तें ? काय मोठी खर्चाची बाब आहे ? अन् तसं म्हटलं तर काकूंनीं त्याच्या खर्चासाठीं

एक रुपयाही आगाऊ देऊन ठेवला आहे. शिवाय शामू कांहीं तसा वाईट का आहे ? पाहा, पाहा किती गोंडस पोरगं आहे तें—"

"हं...हं...ए बुवा !" वत्सलेनं शामूला पुढं करतांच राजाभाऊनं एकदम दोन कदम पिछे असा आपल्या पायांना हुकूम दिला आणि हातांतील छडी ढालीसारखी धरून तो स्वसंरक्षणाच्या पवित्र्यांत उभा राहिला.

त्याच्या ह्या कृतीनं हंसूं न आवरून वत्सला खोऽ खोऽ हंसून म्हणाली,

"अय्या ! भीति वाटते होय शामूची ?"

"भीति...?" तशीच आडवी छडी धरीत व वत्सलेच्या हातांतल्या शामूवरची दृष्टि न ढळवितां राजाभाऊ उद्गारला.

"भीति नाहीं तर मग मागं कां सरकलां ? घाबरलांत—"

"घाबरलों ? त्या मांजराला ?"

"मग कुणाला ? मला ?" वत्सला पुन्हा मोठ्यानं हंसून म्हणाली, "एवढे शूर वीर म्हणवतां-त्या आयटिएफ् का फायटीएफ्मध्यें मारे बूट खडखडावीत जातां अन्-"

राजाभाऊला हा अपमान सहन झाला नाहीं. पत्नीचं भाषण इतर बाबतींत त्यानं ऐकून घेतलं असतं-पण त्याच्या टेरिटोरियल फोर्समधील सैनिकत्वाचा कोणी असा अवहेलनापूर्वक उच्चार केलेला त्याला खपत नसे. पण राजाभाऊ अविचारी नव्हता. तो गंभीर झाला, आणि मध्येंच म्हणाला,

"हें बघ, इतिहासांतल्या त्या परशुरामभाऊ पटवर्धनांचं नांव ठाऊक आहे तुला ?"

"परशुरामभाऊ पटवर्धन ? त्यांचा काय बाई संबंध इथं ?"

"ते फार शूर होते-एकदां न्हाव्यानं त्यांना वस्तरा लावला, तेव्हां त्यांनीं स् हाय असा उद्गार काढला-न्हावी त्यांना हंसला—त्या वेळीं परशुरामभाऊंनीं काय केलं ठाउक आहे ?"

"काय केलं ?" बाहेर फुटत असलेली हास्याची उकळी दबविण्याचा प्रयत्न करीत वत्सलेनं विचारलं.

"ते त्या वेळीं गप्प बसले-"

" अय्या ऽ—"

तिच्या चेष्टेखोर स्वराकडे दुर्लक्ष करून राजाभाऊ अधिक गंभीर होऊन म्हणाला, " हसूं नकोस–पुरतं ऐकून घे–ते गप्प बसले त्या वेळीं–पण मागा-हून त्यांनीं आपला भाला घेतला आणि एवढासा देखील दुःखोद्गार तोंडावाटे न काढतां त्यांनीं तो आपल्या पावलावर मारून घेतला. मग ते न्हाव्याला म्हणाले, 'बोल, आतां मीं हा भाला तुझ्या पावलावर मारतों, माझ्याप्रमा-णंच त्याचा घाव सहन करायची आहे तुझी तयारी ?' न्हावी चळचळां कापूं लागला–गयावया करूं लागला–सांगण्याचा उद्देश काय कीं–" शामूच्या हालचालीकडे नजर ठेवून राजाभाऊ उद्गारला, " शूरत्व हें असं असतं–"

" अस्सं ! अस्सं ! एकूण–"

" हो, तुला काय वाटलं, मीं घाबरलों म्हणून ? छत्, मुळींच नाहीं—मला मांजरं आवडत नाहींत, इतकंच ! एखाद्याला असतो एखाद्या वस्तूचा तिटकारा ! आतां आलं लक्षात ? "

" हं—म्हणजे मघांचा तो शूरपणा होता तर !–" वत्सलेच्या हास्याला पुन्हा जोरानं उकळी फुटली.

किंचित् चिडल्यासारखा होऊन राजाभाऊ म्हणाला, " हें पाहा, तुला थट्टाच करायची असेल, तर माझा नाइलाज आहे—पण एवढं मला सांग, कीं ह्या मांजराला तूं खरंच ठेवून घेणार आहेस इथं ? "

" मग, शंका का आहे ? "

" नाहीं म्हटलं, मांजरांचा अनुभव आहे तुला ? फार नासधूस करतात तीं—कुत्रींमांजरं हे प्राणी घरांत बाळगण्याच्या विरुद्ध आहें मीं—"

" तें खरं—पण काकूंना मीं शब्द दिला आहे ना ? अन् शामू तुमच्या घराची कसली नासधूस करणार नाहीं अशी मी हमी घेतें-मग तर झालं ? "

" अच्छा, मगर कुछ फिकीर नहीं ! पण संभाळून राहा बरं का ! मग लागशील ओरडायला ! "

इतकंच म्हणून राजाभाऊनं बेफिकीरपणाच्या आविर्भावानं एकदम

' राइट अबाउट टर्न ' केलं. हातांतील छडी परत खुंटीवर ठेवली आणि पूर्वीप्रमाणंच गर्रकन् फिरकी मारून तो खोलीबाहेर पडला.

पण राजाभाऊनं पत्नीच्या पुढयांत बेफिकीरीचा आविर्भाव केला खरा; परंतु त्याच्या मनाची शांति एकदां जी ढळली ती कांहीं केल्या ठिकाणावर येईना. घरांत शत्रूनं ठाण दिल्यामुळं त्याला आतां आपली प्रत्येक हालचाल अत्यंत सावधगिरीनं करावी लागत होती. कोण्या वेळीं त्याचा आपल्यावर हल्ला होईल याचा नेम त्याला वाटत नव्हता. यामुळं घरांत राहून त्याला मुळींच स्वस्थता वाटत नव्हती. सकाळच्या आपल्या नित्य क्रमाप्रमाणं वाचनालयांत त्यानं टाकलेल्या फेरीनं आज अधिक वेळ खाल्ला तो याच कारणामुळं ! घरांत आलेल्या त्या शत्रूला हुसकून कसं काढतां येईल याच विचारांनीं त्याचं मन व्यग्र झालं होतं. सकाळीं जशी एकदम चढाई करून त्यानं त्यावर हल्ला चढविला होता, तसा हल्ला पुन्हा चढविणं प्रशस्त वाटत नव्हतं. त्याचा परिणाम भलताच झाला असता. राजाभाऊ लष्करी वृत्तीचा इसम होता–टी. एफ्. मध्यें प्रवेश केल्यापासून लान्स कॉर्पोरलपर्यंत त्यानं अगदीं थोडया अवधींत मजल मारली होती, तरी यशस्वी सेनानायक व्हायचं तर तरवारीबरोबर लेखणी, शक्तीबरोबर बुद्धि, आणि हडेलहप्पीबरोबर मुत्सद्दीपणाही असावा लागतो हें त्याला माहित होतं. आणि ज्या प्रकरणीं त्याला भेद करायचा होता, तें फारच म्हणजे फारच नाजुक होतं. नवीन बिन्हाड थाटून नव्या संसाराला नुक्तीच सुरुवात झालेली—पत्नीला येऊन पुरता एक दिवसही न लोटलेला–अशा परिस्थितींत, जरा दमादमानंच, युक्तिप्रयुक्तीनंच, डावपेंचांनींच आपला कार्यभाग उरकला पाहिजे असं राजाभाऊला वाटलं आणि हे डावपेंच कसे योजावे हें तो आतां हुडकूं लागला.

आणि घरीं येऊन आंघोळ वगैरे आटोपून तो जेवण्यासाठीं पाटावर येऊन बसला, त्या वेळीं कांहीं अंतरावर दुसऱ्या एका पाटावर बसलेल्या शामूकडे पाहतांच, अकस्मातच त्याच्या मेंदूचा एक नवीनच कप्पा उघडला गेला आणि त्यांतून एक नामी शक्कल एकदम बाहेर पडली ! शामू समोर

होता; राजाभाऊला सारं लक्ष त्याच्याचकडे द्यावं लागत होतं; सकाळीं हातांत असलेली ती काठी या वेळीं हातानजीक असावी असा मोह त्याला क्षणोक्षणीं होत होता, पण आपला आव राखण्यासाठीं तो त्याला आवरावा लागत होता. पण अशा दोलायमान मतीच्या स्थितींत देखील ती शक्कल बाहेर पडतांच राजाभाऊच्या मुद्रेवर आनंदाची लकेर चमकूं लागली. त्या भरांत तोंडांत घातलेला पोळीचा तुकडा चर्वण न करतांच घशाखालीं ढकलून व आश्चर्यचकित झाल्याचा अभिनय करीत तो घाईघाईनं उद्गारला,

" अं-हें काय ? "

" काय झालं ? " विस्मयानं त्याच्याकडे पाहत वत्सलेनं विचारलं.

" काकूंच्या शामूला तूं पूर्वी कधीं पाहिलं नव्हतंस वाटतं ?—"

" नाहीं बाई ! कां बरं ? "

" हं, म्हणूनच तें ! "

" म्हणूनच काय ? "

" म्हणूनच काकूंचा शामू म्हणून भलत्यालाच घरांत घेतलास ! "

" भलत्यालाच ? "

" नाहीं तर काय ? तो काकूंचा शामू असता तर नांवाप्रमाणंच काळा नसता का ? "

" अस्सं ! म्हणजे तुम्हांलाही ओळख नाहीं तर शामूची ? नुसता अंदाजच का ? "

" ओळख नाहीं असं कुठं म्हटलंय् मीं ? मीं पाहिला आहे शामूला-पण आपण तर्कशक्ति वापरावयाची होतीत, एवढंच माझं म्हणणं ! "

वत्सला मिस्किलपणं हंसली व उद्गारली,

" तें नको मला सुचवायला-आपणच ती वापरायला हवी होती मला प्रश्न करायच्या अगोदर; काकूंकडून-प्रत्यक्ष त्यांच्या हातून मीं शामूला आणला आहे हें आपण अजिबातच विसरून गेलांत का ?—"

राजाभाऊ पार गोंधळून गेला. आपल्या लक्षांत ही एवढी साधीही गोष्ट यायची कशी राहून गेली याचं त्याला स्वतःलाच नवल वाटूं लागलं.

वत्सला गालांतल्या गालांत हंसत पुढं म्हणाली, " अन् शामू काळा कीं गोरा हें ठरवायला आतांपर्यंत थाबायचं कारण नव्हतं. सकाळींच आपण त्याला पाहिलात त्या वेळींच हें खरं असतं तर सांगितलं असतंत–छान, चांगलं नाटक चालवलं होतं हं ! काय बरं या नाटकाचा उद्देश ? मीं सांगूं का ?–शामूला घरांतून काढून लावायचा आहे !–"

बाजू अंगावर आल्यामुळं राजाभाऊ कांहींसा चिडल्यासारखा झाला. तो चटकन् बोलून गेला, " हं ! असंच–असंच !—"

विजयानंदानं वत्सला उद्गारली, " असंच ना ? मग माझीच तर्कशक्ति चालली म्हणायची ! कशी केली एका माणसाची गंमत !—खोटं घालून खरं काढावं लागतं तें हें असं !—"

" खोटं घालून खरं !—"

" हो, अन् तें कसं तात्काळ बाहेर आलं ! शामूला काकूंनीं आपल्या हातानं कांहीं मजकडे दिलं नव्हतं ! मींच त्याला त्यांनीं सांगितल्याप्रमाणं त्याच्या खोक्यावरून उचलून आणला. काकू अगोदरच पहांटे निघून गेल्या होत्या. पण आपलं नाटक फसलं एवढं खरं !–" वत्सला पुन्हा हंसूं लागली.

आतां प्रकरण फार लांबूं देण्यांत शहाणपणा नाहीं असा पोक्तपणं विचार करून राजाभाऊ पाण्याचा एक घोट घेऊन म्हणाला, " बरं बुवा, आम्हीं नाटक केलं ! पण पाहा बरं, येईल, माझ्या म्हणण्याचा प्रत्यय येईल तुला थोडयाच दिवसांत ! काकू कधीं येणार आहेत म्हणालीस ? "

" येतील एक महिन्याभरांत—"

" महिन्याभरांत !–" राजाभाऊ दचकून ओरडला !

" हं, कदाचित् दीड महिनाही लागेल—"

" हरे राम ! इतकी रजा मिळाली त्या काकूच्या मुलाला ? "

" कां बरं ? मिळूं नये ? "

" तसं नव्हे–पण बघ, कशी लेकाला सुखाची नोकरी मिळालीय्–नाहीं तर आम्हीं ?—"

आणखी अशाच प्रकारचे कांहीं उद्गार काढीत राजाभाऊनं जेवण आटो-पलं आणि तो हात धुण्यासाठीं उठला.

एक डाव फसला. पण राजाभाऊ अपयशानं खचून जाणारा मनुष्य नव्हता. तो लगेच दुसरे डाव योजण्याच्या विचारास लागला. आतांचा डाव मोठ्या विचारपूर्वक व पुढील साऱ्या क्रियाप्रतिक्रियांचीं आगाऊ नक्की अनुमानं बांधून टाकायचा, असा त्यानं निश्चय केला. ऑफिसमध्यें त्याचा सबंध दिवस याच विचारांत गेला. अनेक योजना त्यानं आपल्या मनाशीं आणल्या. एक वेळ त्यानं विचार केला, कीं वत्सलेच्या नकळत शामूला रात्रीचा गोणत्यांत घालून दूर कुठं तरी नेऊन सोडावा व तो पळून गेल्याची ओरड करावी; पण दुसऱ्याच क्षणीं त्याला ही कल्पना अनेक गोष्टींमुळं त्याज्य वाटली. दुसऱ्या वेळीं त्याच्या मनांत कल्पना आली, कीं शामूला कशाची तरी भीति वाटेल अशी दुसरी वस्तु घरांत आणून ठेवावी आणि अशा प्रकारं त्याला घरांत पाऊल ठेवायचाही धीर होणार नाहीं अशी तजवीज करावी. मानसशास्त्रदृष्ट्या हा उपाय त्याला योग्य व परिणामकारक वाटत होता. पण त्यांतील तपशील—ही वस्तु कोणती योजावी हें त्याला सूचत नव्हतं. आपल्या एखाद्या मित्राकडचा कुत्रा आणून त्याला ही योजना करतां आली असती. पण असं करणं म्हणजे पुन्हा मांजराच्या गळ्यांत उंद-रानं घांट बांधण्यापैकींच होतं !

अशा रीतीनं सबंध दिवस विचार करूनही राजाभाऊ संध्याकाळीं ऑफिसांतून घरीं आला, त्या वेळीं एकही योजना त्याच्या मनांत नक्की झाली नव्हती. घरीं येतांच त्यानं कपडे काढतांना एकदा सभोंवार नजर टाकली. शामू किंवा दुसरं कोणीही त्याच्या दृष्टीला पडलं नाहीं. राजा-भाऊच्या मुद्रेवर किंचित् समाधान विलसूं लागलं. आंत स्वयंपाकखोलींत त्याची प्रिय पत्नी त्याच्या चहाची तयारी करण्यांत गुंतली होती, तिथंही तो गेला, तरीही शामूचं अस्तित्व त्याला कुठंच भासेना. तो कांहींसा विस्मयचकित झाल्यावांचून राहिला नाहीं. सकाळचा आपला डाव यशस्वी

झाला कीं काय, अशीही एक अस्पष्ट शंका त्याच्या मनाला चाटून गेली. पण याचा खुलासा होईल थोडयाच वेळांत, असा विचार करून कांहींसा समाधानी अंतःकरणानं पण पूर्ण सावधगिरीनं स्वयंपाकखोलींतून तो बाहेर आला व त्या नादांतच नवीनच घेतलेल्या आपल्या रेडिओचं बटन फिरवून त्यानं तो सुरू केला अन् मग त्यांतून बाहेर पडणाऱ्या झक्कड-खांसाहेबांच्या गाण्याची मजा लुटण्यासाठीं तो जवळच्या आरामखुर्चीवर पहुडला.

खांसाहेबांच्या तोंडून एक पल्लेदार तान बाहेर पडली. राजाभाऊनं मान डोलविली आणि—

" हरेऽराम ! ! "

राजाभाऊनं ताडदिशीं उडी मारली !

—रेडिओखालच्या टेबलक्लॉथनं आच्छादलेल्या छोट्या टेबलाखालून खांसाहेबांच्या तानेसरशीं दोन प्राणी एकाएकीं अवतीर्ण होऊन राजाभाऊच्या डोळ्यांसमोर चमकले आणि दुसऱ्याच क्षणीं स्वयंपाकखोलीच्या रोखानं अदृश्य झाले !

ते प्राणी मांजरासारखेच होते, याबद्दल राजाभाऊला शंका उरली नाहीं. त्यांतील एक शामू होता हें तर त्यानं चटकन् ओळखलं आणि शामू जितका गोरा होता तितकाच दुसरा प्राणी त्याला काळा दिसला !

राजाभाऊ स्तंभित झाला ! एका क्षणापूर्वी त्यानं काय अपेक्षा केली होती आणि हा काय निराळाच प्रकार घडून आला होता !

" मारलंत शामूला ? "

" मारलं ? " वत्सलेच्या शब्दांनीं राजाभाऊ भानावर येऊन उद्गारला. वत्सलेनं हातांतील चहाचा पेला टेबलावर ठेवीत म्हटलं,

" मग ते दोघे कसे आले स्वयंपाकघरांत शेपट्या उडवीत ? "

" मीं नाहीं मारलं—" राजाभाऊनं जोरानं मान हालविली. " पण —पण तो—तो दुसरा कसा आला इथं !—"

" मीं आणला त्याला ! "

" अं ?..."

" हो—सकाळीं तुम्ही तो पहिला शामू, काकूचा शामू नव्हे म्हणून सांगितलंत तेव्हांपासून मलाही शंका येऊं लागली. अन् शिवाय काकूनं सांगितलं होतं, कीं शामू भाताला तोंड लावायचा नाहीं; पण ह्या शामूला मीं थोडा दूधभात घालतांच त्यानं तो कसा अगदीं चटकन् मटकावून टाकला ! तेव्हां मीं ही शंका फेडून घेण्यासाठीं काकूंच्या त्या शामूला नेमून दिलेल्या खोक्याकडे पुन्हा एक फेरी टाकली. अन् पाहतें तों काय ?—अगदीं आपण सांगितल्याप्रमाणं एक छोटा काळा बोका मला तिथं बसलेला दिसला..."

" आँ !......"

" हं, मलाही थोडंसं नवल वाटल्यावांचून राहिलं नाहीं. मीं त्याला लगेच घरीं आणला; पण तितक्यांत मला पुन्हां संशय आला, कीं ह्या दोघां शामूंत खरा शामू कोणता ? तेव्हां आतां मीं असा विचार केलाय् कीं, काकू येईपर्यंत अगर खऱ्या शामूचा शोध लागेपर्यंत दोघांनाही ठेवून घ्यायचं—हो, थोडीशी कळ सोसावी लागली तरी हरकत नाहीं, पण आपली चूक होऊं देतां नये–शब्दांची चाड न बाळगून कसं चालेल माणसाचं ! "

राजाभाऊनं अधरोष्ठ किंचित् चावला; पण तो कांहींच बोलला नाहीं. टेबलावरील चहाचा पेला उचलून त्यानं त्यांतील चहा घटांघटां पिवून टाकला, आणि इकडे तिकडे सावधगिरीनं दृष्टि फेकत त्यानं आरामखुर्ची-वर आपलं अंग टाकलं.

ती रात्र त्यानं जवळजवळ जागूनच काढली.

राजाभाऊला आतां एकाऐवजीं दोन शत्रूंचा समाचार घ्यायचा होता. पण परिस्थिति जरी अशा प्रकारं अधिक बिकट झाली होती, तरी एकंदरींत विचार करतां मान्याची त्यानं शोधून काढलेली बाजू अजूनही रोखली गेली नव्हती. शामूच्या तोतयेपणाबद्दलचा जो मुद्दा त्यानं उपस्थित

केला होता, तोच पुढं चालविण्यानं आपला डाव यशस्वी होईल असा त्याला विचार करतां भरंवसा वाटूं लागला. सारी रात्र डोक्याला शीण देऊन अखेरीस त्यानं एक योजना ठाम आंखून तयार केलीच !

या योजनेप्रमाणं दोन्हीही शामू तोतये असल्याचं त्याला सिद्ध करायचं होतं. आणि हें करण्यासाठीं काकूंनीं सांगितलेल्या शामूच्या संवयीपलीकडे दोघांचंही वर्तन फार निराळं आहे एवढं दाखवून दिलं, कीं त्याच्या मतं बस्स होतं ! योजना अगदीं साधी होती. पण म्हणूनच मानसशास्त्राच्या कसोटीला ती परीपूर्ण उतरणारी, अतएव यशस्वीतेबद्दल किमपिही शंका नसलेली अशी होती. अधिकाधिक विचार करतां हेंच त्याचं मत ठाम झालं.

तो दिवस शनिवार होता. राजाभाऊ ऑफिसांतून दुपारींच सुटला. येतांना त्यानं इराण्याच्या दुकानांतून एक पॅकबंद करून ठेवलेला विलायती माशांचा डबा विकत घेतला. हा डबा म्हणजे शामूच्या तोतयेपणाची कसोटी होती ! मांजर किती झालं तरी मांसभक्षक प्राणी. तेव्हां मासे पाहिल्याबरोबर त्याची जीभ राहायची नाहीं हें राजाभाऊला पूर्णपणं ठाऊक होतं. पण काकूंच्या शामूनं आपली संवय सोडून भाताला तोंड लाविलं, तरी माशांना तो कदापिही तोंड लावायचा नाहीं अशी वत्सलेची कल्पना असणार आणि या कल्पनेबाहेर प्रकार झालेला आढळून आला, कीं ती आपला हट्ट सोडून द्यायला चटकन् प्रवृत्त होईल असा तर्क राजाभाऊनं केला होता व यावरच त्याचा हा सारा नवीन डाव उभारलेला होता.

पण याही वेळेला दुर्दैवानं राजाभाऊची पाठ पुरविली !

डबा उघडतां उघडतां वत्सलेला त्यानं त्या डब्याचा हेतु सांगितला आणि डबा उघडून त्याचा दर्प सहन होत नसतांही, तो हातांत घेऊन, मोठा धीर करून तो, शामूची जोडी जिथं बसली होती त्यापासून दोन पावलांच्या अंतरावर गेला. आणि तिथं तो डबा ठेवून त्यानं त्यांना पाचारण केलं—

" यव्–यव्–यव्–यव्......"

एथवर सर्व ठीक जमलं. पण तितक्यांतच काय झालं कुणाला ठाउक ! राजाभाऊनं वत्सलेच्या मुद्रेकडे पाहिलं, तों तिजवर त्रासिकपणाची छटा

त्याला दिसूं लागली. दुसऱ्या क्षणीं, त्या छटेचं रागांत रूपांतर झाल्याचं त्याला दिसून आलं आणि-आणि तिसऱ्या क्षणीं तो त्यानं खालीं ठेवलेला डबा खिडकीबाहेर हवेंत गिरक्या खातांना त्याच्या दृष्टीला पडला !

आतां मात्र आपल्या सहनशीलतेची परमावधि झाली असं राजाभाऊला वाटलं ! अपमान, अपमान म्हणून किती सहन करायचा ? तो तसाच उठला आणि वत्सलेकडे एक दृष्टिक्षेपही न करतां बाहेरच्या गॅलरींत जाऊन रस्त्याकडे पाहत उभा राहिला.

रस्त्यावर बाजूलाच तो डबा, त्यांतील सारी चीजवस्त बाहेर पडून कावळ्याच्या तडाक्यांत सांपडलेला त्याच्या शून्यपणं भटकणाऱ्या नजरेला पडला. आणि त्याकडे लक्ष जातांच राजाभाऊच्या डोक्यांत आतां नुक्ताच नवीन उद्भवलेला विचार कायम झाला. राजाभाऊ अहिंसावादी नव्हता; अहिंसात्मक सत्याग्रहाचं शस्त्र स्वातंत्र्ययुद्धांत किंवा इतर कोणत्याही युद्धांत उपयोगी पडूं शकत नाहीं असं त्याचं पूर्ण विचारान्तीं मत बनलं होतं. तरी पण नाजुक बाबतींत हें शस्त्र फार परिणामकारक ठरूं शकतं हें तो चांगलंच जाणून होता. आणि तशांतही राजाभाऊ वर सांगितल्याप्रमाणं विचारी मनुष्य होता. सत्याग्रहाचा मार्ग आतां अवलंबण्याचं त्यानं ठरविलं, तरी हा सत्याग्रह आरंभावयाचा तो अन्नसत्याग्रहापेक्षां मौन-सत्याग्रहच आरंभणं त्याला श्रेयस्कर वाटलं.

राजाभाऊ पुन्हा आंत आला. टेबलावरील पॅडवरचा एक कागद त्यानं फाडला आणि त्यावर त्यानं पुढील शब्द लिहिले :

" आजपासून मीं तुझ्याशीं बोलणं सोडीत आहें. त्या दोघां बोक्यांना घरांतून काढून लावल्याखेरीज मीं एक चकार शब्दही तुझ्याशीं न बोलायचा निश्चय करीत आहें. "

राजाभाऊनं ही चिठी वत्सलेपुढं ठेवली आणि मग मागं येऊन आढ्याकडे पाहण्याचा आविर्भाव करीत, पण चिठीचा काय परिणाम होतो याकडे बारकाईनं लक्ष ठेवीत तो खुर्चीवर स्वस्थ बसला.

दोन मिनिटांनीं त्याला आश्चर्याचा एक मोठा थोरला धक्का बसला ! त्याच्या पुढ्यांत एक चिठी येऊन पडली होती व त्यावर लिहिलं होतं:

" आपण बोलत नसलां तर मलाही कांहीं बोलायची जरुरी नाहीं. आपण ज्या वेळीं बोलाल त्याच वेळीं मी बोलेन—"

राजाभाऊ चकीत झाला. हें त्याच्या अपेक्षेबाहेर झालं होतं. त्यानं पुन्हां दुसरी चिठी लिहिली : " पाहा बरं, तुझा आग्रह तूं सोडला नाहींस, तर तुझ्या म्हणण्याप्रमाणंच काकू येईतोंवर चांगला दीड महिना—एकदोन दिवस नव्हे—मला तुझ्याशीं माझ्या प्रतिज्ञेप्रमाणं बोलणं करतां येणार नाहीं, नीट विचार कर आणि शहाणपणानं उत्तर दे —"

कांहीं वेळानं त्याच्या पुढ्यांत दुसरी चिठी येऊन पडली :

" विचार करूनच उत्तर दिलं आहे मीं—अपराध माझा नाहीं.—आग्रह अगर हट्ट मी धरीत नाहीं—तो आपणच धरीत आहां. शामूला हाकून द्यायला आपण सांगत आहां आणि तें मला जमायचं नाहीं—"

राजाभाऊ किंचित् गरम झाला. त्यानं एकच वाक्य लिहिलं :

" माझ्यापेक्षां तुला शामू अधिक वाटतो, होय ? "

त्याला उत्तर मिळालं :

" अन् माझ्याखातर तुम्ही कांहींच करणार नाहीं अं ? "

त्यानं लिहिलं : " पण शामूमुळं मला मनस्वी त्रास होत आहे तो मीं सोसूं असं तुझं म्हणणं ? त्याबद्दल तुला कांहींच वाटत नाहीं ? "

उत्तर आलं : " जरूर सोसला पाहिजे. मी काकूंच्या शब्दाला गुंतलें आहें. मला या वेळीं मदत करणं हें आपलं कर्तव्य आहे. "

राजाभाऊनं लिहिलं : " मला त्रास होत असलेला तुला पाहवेल ना ? "

उत्तर मिळालं : " मग काय करणार ? नाइलाज आहे माझा ! "

राजाभाऊनं पुन्हा लिहिलं :

" मग माझ्यावर तुझं मुळींच प्रेम नाहीं असंच समजूं ना मीं ? "

वत्सलेकडून उत्तर आलं : "हा वृथा गैरसमज करून घेणं न घेणं आपल्या हातीं आहे—आपण मर्जीला येईल तसं करावं—"

राजाभाऊ उत्तर आठवूं लागला.

" पाहा बरं "–त्यानं लिहिलं, पण तो पुढचे शब्द आठवून कांहीं लिहिणार, इतक्यांत खण्‌ण्‌ असा दरवाजावरील घंटेचा नाद त्याच्या कानीं आला आणि तो ही कंटाळवाणी पत्रापत्री बाजूला सारून लगबगीनं उठला. बाहेर येतांक्षणींच त्याच्या हातांत पोस्टमननं एक कार्ड ठेवलं.

राजाभाऊनं कार्डावरून प्रथम एकदा तें उलटसुलट करून दृष्टि फिर-विली आणि मग त्यांतील गिचमिड मजकुरावरून त्याचे डोळे फिरूं लागले. तें कार्ड असं होतं:

" चि. सौ. बच्छीस अनेक आशीर्वाद. पत्र लिहिणेंस कारण कीं, आम्ही खुशाल आहोंत. तुझी व तुझ्या नवऱ्याची खुशाली कळीव. शामू इकडे खुशाल आहे. माझा जीव राहीना म्हणून मीं त्याला बरोबरच नेण्याचें ठर-विलें. रोवळींत घालून त्याला आणला. तुला सांगायला मिळालें नाहीं. कारण तुम्ही त्या वेळीं झोंपलां होतां आणि उगाच कशाला उठवा असें मीं म्हटलें. इकडे यमूच्या मुलांबरोबर त्याची गट्टी जमली आहे. घाईनें पत्र एवढ्यासाठींच घालीत आहें कीं तुजजवळ जो रुपया दिला आहे तो आमच्या दूधवाल्याला दे. त्याचे पैसे देण्याचें राहून गेलें होतें. कळावें हे आशीर्वाद.

तुझी
काकू "

राजाभाऊला तो मजकूर लावून वाचावा लागत होता. पण शक्य तितक्या घाईनं तो त्यानं वाचून संपविला; आणि मग पुन्हा एकदा त्या कार्डावरून नजर फिरवून तो तें चिमटींत धरून धांवतच आंत गेला; तिथं वीणकाम घेऊन स्वस्थपणं बसलेल्या वत्सलेच्या अंगावर तें कार्ड त्यानं फेकलं आणि विजयानंदाच्या सुरांत तो ओरडला,

" पाहा, पाहा, आतां तरी होईल ना खात्री ! वाच, वाच तें—"

आणि मग त्यानं आपल्या आंतल्या खोलींत जाऊन आपलं शस्त्र—ती छडी हातीं घेतली आणि जिभल्या चाटीत बसलेल्या त्या मार्जार-द्वयाची एक क्षणांत दाणादाण उडवून दिली !

## गुलाबी कोडं

प्रेमांत पडलेल्या अनेक तरुणांना त्या 'चमत्कारिक' अवस्थेचा काय अनुभव येत असेल तो असो; पण श्रीनिवास ऊर्फ शिनू चिरमुल्याचं या बाबतींतील मत तुम्ही विचारलंत, तर तो तुम्हाला हेंच सांगेल कीं, प्रेम आणि आचरटपणा हीं दोन भाववाचक नामं जणूं अक्षराष्ट्र म्हणूनच वाव-रण्यासाठीं या जगांत निर्माण झालीं आहेत! शिनूचं म्हणणं असं कीं प्रेमाचा हा असा कांहीं विचित्र नियम नसता, तर उत्तरा सुळाखे या मधुर नांवानं जगाला आपली ओळख देणाऱ्या अन् गालांना नाजुकशी खळी पाडून नी ओंठाचे मजेदार चाळे करीत गोड गोड बोल काढणाऱ्या त्या दिलचस्प पोरीनं त्याच्या हृदयाचा किल्ला सर करून टाकतांच आपलं पूर्वीचं मत बदलून क्रॉसवर्ड कोडयासारख्या त्या आचरट फंदांत एकाएकींच पडायची बुद्धि त्याला व्हावीच कशी? अन् त्यांतही गंमत अशी कीं शिनू ह्या फंदांत पडला होता, तो उत्तरेला ह्या कोडयांची आवड होती म्हणून नव्हे; तर काकासाहेब सुळाख्यांना त्यांचा विलक्षण छंद होता म्हणून! काकासाहेबांची आणि शिनूची अजून ओझरत्या एका भेटीच्या प्रसंगा-पेक्षां अधिक ओळख झालेली नव्हती; पण क्रॉसवर्ड कोडयांत दिग्विजय गाजविणाऱ्या तरुणाकडे ते सादर कौतुकानं पाहिल्याखेरीज खास राहणार नाहींत व त्यांना त्याच्याबद्दल अतिशय जिव्हाळाही वाटल्यावांचून राहणार नाहीं, याबद्दल मात्र त्याला किंचिन्मात्रही शंका वाटत नव्हती.

आणि यामुळंच उत्तरेला ह्या कोडयांबद्दल नावडच नव्हे, पण अतिशय तिट-कारा वाटत होता हें त्याला माहित होतं, तरीही तिचं मत एवढ्या एका बाबतींत बाजूला सारून त्यानं या फंदांत उडी घ्यायचं ठरविलं होतं, नव्हे, ही उडी त्यानं पुरती ठोकलीही होती. कारण आतांपर्यंत त्यानं तीन वेळां कोडयांच्या या स्पर्धेत भाग घेतला होता; आणि त्यांत प्रथमच्या कोडयांतील अठरा चुकां-वरून नुकत्याच निकाल लागलेल्या तिसऱ्या कोडयांत चार चुकांपर्यंत त्यानं झपाटयानं मजलही मारली होती. आतां यापुढं या आठवडयांतच पाठवा-यच्या नाताळच्या खास कोडयाला जें पहिलं २५००० रु. चं बक्षिस ठेवलं आहे, तें कुणी सांगावं, कदाचित् आपल्याच खिशांत पडणार नाहीं कशावरून, असं नव्या आशेचं पांखरूंही त्याच्या अंतःकरणांत जोरानं फडफडूं लागलं होतं. आणि या फडफडाटानं उसळविलेल्या उत्सा-हाच्या वाऱ्यानं त्याचं अंतःकरण आज दोन दिवस इतकं कांहीं भरभरून गेलं होतं, कीं त्यामुळं आतां देखील जेव्हां तो घरीं जातां वाटेंत ‘ पावणा ’ घेण्यासाठीं म्हणून आपल्या नेहमीच्या इराणी हॉटेलांत त्या ठरींव टेबलापाशीं येऊन बसला, तेव्हां समोरच्याच खुर्चीवर दुसरी एक व्यक्ति आरूढ झाली असून तिचा सारा थाट काकासाहेब सुलाखयांच्याच छबीशीं तंतो-तंत जुळता आहे, हें प्रथम कांहीं मिनिटं त्याच्या लक्षांतही येऊं शकलं नाहीं !

काकासाहेबांच्या त्या अनपेक्षित दर्शनानं तो जितका विस्मित झाला, तितकाच मनांतल्या मनांत आनंदूनही गेला. काकासाहेबांची ही अशी इथं आकस्मिक भेट व्हावी हा योगायोग नवलपूर्ण तर खराच; पण तो अशा तऱ्हेनं घडवून आणण्यांत दैवाचा कांहीं गोड हेतुही असण्याचा फार संभव आहे असा विचार त्याच्या तत्क्षणींच मनांत येऊन गेला. अचानक आलेल्या त्या शुभ संधीचा त्यानं तत्काळ फायदा घेण्याचं ठरविलं आणि मग पहिला हल्ला चढवण्यासाठीं चटकन् स्मितावून त्यानं तोंड उघडलं.

“ नमस्ते !—” तो उद्गारला.

काकासाहेबांनीं तोंडातल्या तोंडांत गुरगुराट केला आणि ते त्याच्याकडे अधिकच तीक्ष्ण दृष्टीनं रोखून पाहत उद्गारले, “ आँ ऽऽ ! ”

" मला ओळखलं नाहींत ?—" शिनू आणखी स्मितावून म्हणाला, " मीं आलों होतों एकदोनदां आपल्याकडं—"

" अं ?—"

" हं ! पण त्या वेळीं आपण फार कामांत होतां, म्हणून फक्त ओझरतीच भेट होऊं शकली. आतां हा अलभ्य लाभ झाला !— "

" हंऽऽ " काकासाहेब पुन्हा नुस्तेच हुंकारले.

" आपलं नांव मीं गेल्या कीं त्यापूर्वीच्या वुइकलींत छापून आलेलं पाहिलं ! कॅांग्रॅट्स् !—"

" तुमचं नांव—तुमचं नांव—" काकासाहेबांना या वेळीं एकदम कसली तरी स्फूर्ति होऊं लागल्याचं त्याला दिसून आलं !

" माझंसुद्धां नांव आलंय् त्याच कॅालममध्यें—" कांहींशा विनयानं पण अधिक उल्हासभरानं शिनू लगेच म्हणाला, "—फोर एरर्स—चार चुका !— इट्स् क्वाइट अ गुड बिगिनिंग ! आपल्याला नाहीं वाटत ? "

" अं ?—"

" आपल्याला घरीं येऊनच कॅांग्रॅट्स् देणार होतों मी ! पण आतांशा ऑफिसचं काम भयंकर वाढलंय् !—"

" हं—पण—"

" सध्या नवा जमाना सुरू झाला आहे ना ! " शिनू चटकन् पुढं म्हणाला, " पण मला कौतुक वाटतं तें आपलं ! इतका व्याप मागं असूनही ह्या कोडयांत लक्ष घालायला फुरसद कशी मिळते आपल्याला ! मला वाटतं, नाताळच्या नव्या खास कोडयाचंही उत्तर पाठवलं असेल आपण इतक्यांत !"

काकासाहेबांनीं तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी चघळल्यासारखी ओठांची हालचाल केली आणि मग ते शिनूकडे पुन्हा रोखून पाहत म्हणाले,

" पण तुम्ही—तुम्ही—?—"

" मीं नाहीं अजून पाठवलं ! " वाढत्या विनयानं शिनू पटकन् स्मितावून म्हणाला, " बाकी सारे शब्द पक्के ठरवलेत; पण एका शब्दाबद्दल अजून

नक्की मत ठरत नाहीं आहे माझं !—पॅड, सॅड, कॅड, मॅड, डॅड, लॅड, वॅड, गॅड, बॅड—"

" आँ ? आँ ? पॅड,—सॅड—गॅड—"

काकासाहेब आपल्या बोलण्यांत थोडेथोडे रमूं लागले आहेत, हें पाहून शिनू उत्तेजित स्वरांत म्हणाला,

" हं, काय वाटेल तो शब्द लागेल तिथं ! "

" पॅड—सॅड—गॅड—? " भुंवया आकुंचित करून काकासाहेब पुन्हा उद्गारले, " पॅड—सॅड—"

" अंऽ हं ! " शिनू घाईघाईनं पटदिशीं म्हणाला, " एक्झॅक्टली कांहीं पॅड, सॅड, गॅड, नव्हे !—पणं ' ॲड 'चे इतके शब्द आहेत कीं त्यांतून कोणता तिथं घालावा हेंच कळत नाहीं ! क्रॉसवर्डवाल्यानं बेट्यानं हजार पळवाटा ठेवल्या आहेत या ' थर्टिसिक्स ॲक्रॉस ' 'मध्यें ! "

" थर्टिसिक्स ॲक्रॉस ? म्हणजेऽऽ म्हणजे—" काकासाहेबांनीं आठवण करण्यासाठीं बारीक डोळे करून समोरच्या भिंतीकडे पाहिलं.

" आहे, क्ल्यु आहे माझ्यापाशीं इथंच ! " क्रॉसवर्ड कोड्याचं पान घाईघाईनं खिशांतून काढून तें उलगडीत शिनू उद्गारला, " यस्, सांपडलं ! थर्टिसिक्स ॲक्रॉस—ए गर्ल इज ॲप्ट टु क्वारल वुइथ धिस, व्हेन ध क्वश्चन ऑफ् मॅरेज अरायझिस !—मला वाटतं, मला वाटतं, इट मस्ट वी डॅड्." शिनू आकस्मिक स्फूर्ति झाल्यासारखा पटकन् बोलून गेला.

" आँ—? डॅड ?—"

" यस्, डॅड !—"

" डॅड म्हणालांत तुम्ही ? " ओठांची बेसुमार चुळबुळ करून काकासाहेबांनीं विचारलं.

" हं—डॅडच ! " आपल्या उत्तराच्या अचूकतेबद्दल खात्री पटवण्यासाठीं शिनू पुन्हां उल्हासाच्या भरांत म्हणाला, " कारण असं पाहा !—कारण असं, कीं मुली लग्नाच्या बाबतींत बहुधा नेहमीच त्यांच्या वडिलांबरोबर भांडतांना दिसतात !—"

" नो— " जोरानं मान हालवून काकासाहेब म्हणाले, " साफ चूक आहे हें ! "

" साफ चूक आहे ? "

" अर्थात् ! "

" 'डॅड' चूक आहे ? "

" ऑफ् कोर्स ! " काकासाहेब ठांसून उद्गारले.

" पण कसं ?— "

" कसं ?— " डोळे विस्फारून शिनूच्या चेहऱ्याकडे पाहून काकासाहेबांनीं ओठाची पुन्हा चुळबुळ केली.

" हं— " शिनूची जिभली पुन्हा चळवळली, "नाहीं तर इतका अचूक शब्द दुसरा कुठचा सांपडतोय ?— "

" कसं ? " शिनूच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून काकासाहेब म्हणाले, " कसं ? —म्हणजे, लग्नाच्या वेळीं पोरी बापाबरोबर भांडतात असं तुम्हांला म्हणायचंय ?—लग्नाच्या पोरी बापाबरोबर भांडतात ?—बापाबरोबर भांडतात पोरी ? "

मनुष्य थोडासा उतावळा असला आणि विशेषतः वाद घालायची त्याला वाईट खोड जडलेली असली, कीं त्याला व्यक्ति आणि प्रसंग यांचं भान राहत नाहीं. शिनूही या नियमाला मुळींच अपवाद नव्हता. त्याच्या जिव्हेला भलतंच स्फुरण चढलं आणि ती फुरफुरली,

" बापाबरोबर नव्हे, तर कुणाबरोबर ? "

" तर कुणाबरोबर ? " काकासाहेब ताठ बसते होऊन म्हणाले.

" हं—म्हणजे असं कीं, डॅड शब्द लागू पडत नाहीं तिथं, तर दुसरा कोणता शब्द लागू पडतो ? "

" लॅड !—लॅड —यू अंडरस्टॅंड—? ' लॅड ' हा शब्द पाहिजे आहे तिथं ! ' काकासाहेब जोरान म्हणाले, "लॅड म्हणजे यंग मॅन ! पोरी भांडतील पोरांबरोबर, बापाबरोबर नाहीं भांडायच्या ! कळलं ? "

" लॅड !— "

" यस् लॅड !–लॅड !––"

" पण लॅडपेक्षां—"

" नो—" काकासाहेब मध्येंच आवेशानं मान हालवून म्हणाले, " डॅड इज नॉट ध वर्ड ! ' लॅड ' शब्दच असला पाहिजे तिथं ! ' लॅड ' नसलाच कदाचित्, तर ' कॅड ' असेल !—"

" कॅड ? "—शिनूनं भुंवयांना एकदम ताण दिला.

" हं–कॅड ! अन् कॅड कदाचित् नसलाच, तर ' गॅड ' असेल !– डिक्शनरी पाहिलीत ?–गॅड म्हणजे भटक्या ! कॅड म्हणजे हलकट मनुष्य ! पोरी असल्या इसमांशीं लग्न करणार नाहींत, त्या भांडण करतील त्यांच्याबरोबर !"

शिनूला वादाचा आतां पुरताच आवेग चढला. तो मान उडवून उद्गारला, " कॅड–लॅड–गॅड–? हुंः !—"

" नाहीं तर रॅड !–रॅड म्हणजे रॅडिकल–जहाल ! "

" रॅड ?–मग पॅड कां नाहीं, न् वॅड कां नको ? " वादाचं वारं पुरतंच अंगांत संचारून शिनू म्हणाला, " नी बॅड, सॅड ?—लॅड, कॅड, मॅड हे शब्द इथं मुळींच बसत नाहींत ! डॅडशिवाय दुसरा कोणताच शब्द लागू पडत नाहीं इथं ! "

काकासाहेबांनीं पुन्हां एकदां तीव्र नजरेनं शिनूकडे पाहिलं आणि ते म्हणाले, " यु आर् रॉंग–डॅड इज नॉट ध वर्ड ! "

" कुणी सांगितलं ? "—

" मीं सांगतों !–तो तिथं शब्द घालणारा कांहीं मूर्ख नाहीं !–अन् मीं सांगतों तें अनुभवाच्या जोरावर ! माझ्या दोघां पोरींचीं लग्नं केलीं मीं, पण एक कुणी भांडली नाहीं माझ्याशीं ! अन् तिसरी आहे तीही नाहीं भांडणार ! हा अनुभव तुम्हांला आहे ? "

" अनुभव नसेल, पण—

" पण नाहीं न् कांहीं नाहीं. मीं तुम्हांला पुन्हां सांगतों, मिस्टर–मिस्टर मिस्टर—"

" चिरमुले ! " शिनू पटकन् म्हणाला.

" चिरमुले ? तुमचं नांव चिरमुले ? " काकासाहेब किंचित् चढ्या स्वरांत उद्गारले.

" हं चिरमुले—एस्. जी. चिरमुले, श्रीनिवास जी. चिरमुले ! "

काकासाहेबांनीं डोळयांचीं चमत्कारिक हालचाल केली आणि ते पुन्हां उद्गारले, " श्रीनिवास चिरमुले ?"

" हं, कां ? का–काय–काय ?"

पण शिनूचे आश्चर्योद्गार त्याच्या तोंडून पुरते बाहेर पडण्यापूर्वीच काका-साहेब मध्येंच म्हणाले, " मग तें पत्र–तें पत्र—? "

" कुठलं पत्र ? "

" तें पत्र ! उत्तरेला पाठवलंत तें ? तें तुम्ही पाठवलं होतंत ?"

अकस्मात् कसली तरी चमक शिनूच्या हृदयांत उसळून गेली. उत्तरेला आपण काल पाठविलेली चिठ्ठी काकासाहेबांच्या हातीं तर पडली नाहीं ना अशी शंका त्याच्या डोक्यांत एकदम प्रकटली. आपल्या धडधडत्या हृद-याचे ठोके त्याला स्पष्ट ऐकूं येऊं लागले. तथापि एक आवंढा गिळून तो म्हणाला, " उत्तरेला कुणीं पत्र पाठवलं होतं ?"

काकासाहेबांनीं पुन्हां डोळे रोखून शिनूकडे पाहिलं आणि खिसे चांचपून एक चिठ्ठी काढून शिनूच्या दृष्टीसमोर ती नाचवीत ते म्हणाले,

" हें पत्र तुमचं नसेलच बहुतेक !"

" ऑं ! ऑं !–" शिनू अतिशय गोंधळून जाऊन म्हणाला, " तुमच्या-कडे कसं आलं ? "

" कसं आलं ?–कसं आलं !–आलं कसं तरी !–पण तुम्हींच लिहिलंत ना हें पत्र ! चोरटीं पत्रं पोरींना धाडायची कुठं शिकलांत ही विद्या ? "

शिनू अतिशय बुचकळयांत पडला, ही चिठ्ठी काकासाहेबांच्या हातीं कशी पडावी, हेंच त्याला उमगेना. त्या पोरीकडूनच नाहीं ना ती काकासाहेबांनीं काढून घेतली ? आपण काय आज पहिल्यांदाच ही अशी चिठ्ठी त्या पोरीला पाठविली नव्हती. या अगोदरच्या अनेक चिठ्ठया नेमक्या त्या नाजुक हातांत जाऊन पडल्या होत्या. सारं टपाल कसं अगदीं चोखपणं पोंचत होतं ! पण

आजच हा सेन्सॉर कसा बसावा ! काय भानगड आहे ही ? शिनूला त्या प्रकाराचं फार फार नवल वाटूं लागलं !

पण तसं नुसतं नवल करीत काकासाहेबांनीं त्याला फार क्षण बसूं दिलं नाहीं. त्याची गोंधळलेली मुद्रा पाहून त्यांना जणूं चेवच चढल्यासारखा झाला आणि ते म्हणाले,

" छान, छान ! छान धंदे चालविले आहांत तुम्ही ! मला कल्पना नव्हती, कीं तुम्हींच ते श्रीनिवास चिरमुले असाल म्हणून ! चेहरा ओळखीचा वाटला, पण नांव नव्हतं लक्षांत राहिलं ! तरीच–तरीच हं ! मघांपासून तुम्हांला नांव विचारतोंय् तर तुम्ही उडवाउडवी करीत आहां !"

" छेः छेः छेः ! उडवाउडवी नव्हे, मुळींच नव्हे ! " काकासाहेबांचा गैरसमज दूर करण्यासाठीं शिनू मध्येंच घाईघाईनं म्हणाला.

पण त्याचं म्हणणं ऐकून न घेतां काकासाहेब लगेच म्हणाले,

" समजलों, समजलों ! बरं झालं, लवकर लक्षांत आलं माझ्या ! आतां तुम्हांला सांगून ठेवतों, हा चावटपणा यापुढं चालू ठेऊं नका ! कळलं ? परिणाम बरा व्हायचा नाहीं ! त्या पोरीलाही मीं सांगून टाकलंय त्या चिरमुल्याच्या कीं मुरमुऱ्याच्या आसपास फिरकायचंसुद्धां नाहीं. आतां तर तिला सरळच जाऊन सांगणार आहे, कीं तुला हा पत्र पाठवणारा चिरमुला का कोण तो नीट चांगला पाहिला. अशा पोरांशीं ओळखसुद्धां करणं पाप आहे. फ्रासवर्ड सोडवण्याखेरीज धंदा नाहीं लेकाला ! मेहनत नको करायला न् फुकाचा मिळाला तर पैसा हवा मारायला !"

काकासाहेबांच्या माऱ्यानं शिनू पार जमीनदोस्त होण्याच्या बेतांत आला होता. तरी पण शेवटचे ते शब्द ऐकतांच तो गडबडीनं म्हणाला,

" नो नो नो-साफ चुकतां आहां तुम्हीं ! "

" ऑं ? " नाक उडवून नाकावरच्या चष्म्याला एक जोराचा हेलकावा देऊन काकासाहेब म्हणाले, " मी चुकतोंय् ? "

" तसं नव्हे, म्हटलं माझ्याबद्दलचं—"

" सारं कळलं तुमच्याबद्दलचं मला !" काकासाहेब मध्येंच उत्तरले, " मी

चुकतोंय होय ? ठीक ! ठीक ! मग तुम्हांला काय म्हणायचंय्, पोरी आपल्या बापाशीं भांडतात असंच ना ? म्हणा कीं !–पण यापुढं, पुन्हां एकदां सांगून ठेवतों, कीं यापुढं उत्तरेला तुम्हीं चिठीचपाटी पाठवून त्रास दिलात, तर पुढचा तुमचा कडक बंदोबस्त मला करावा लागेल ! कळलं ? एकादी पोरगी पाहिली कीं तिच्या मागं लागायची तुम्हां अलीकडच्या पोरांना फार वाईट दुष्ट खोड लागलीय ! पोरी अशा कांहीं वाटेवर पडलेल्या नाहींत ! पुन्हां जातां जातां सांगून ठेवतों, उत्तरेला त्रास देऊं नका ! ”

कांहीं कांहीं वेळा अशा विचित्र असतात, कीं दैवानं अकस्मात आणून दिलेली बहुमोल संधि म्हणून तुम्ही तिचा उत्साहानं उपयोग करून घ्यायला जातां, आणि अचूक तीच वेळ तुम्ही आंखलेला सारा डाव बिघडवून टाकायला कारणीभूत होत असते. त्यापेक्षां, या दिशेला आपण गेलोंच नसतों तर फार बरं झालं असतं असंच मग तुम्हांला सारखं वाटायला लागतं. काकासाहेबांच्या त्या हृदयविदारक मुलाखतीनंतर शिनू ज्या वेळीं जड पावलांनीं हळू हळू आपल्या खोलीवर आला, त्या वेळीं हाच विचार त्याचं अंतःकरण खाऊन टाकीत होता. पण ह्या विचारापेक्षांही उत्तरेला पाठविलेली ती चिठी तिच्या त्या गाजरपारखी नी भावनाशून्य, बुद्धिशून्य, अक्कलशून्य अन् आणखीही अनेकशून्य पित्याच्या त्या राठ रूक्ष, हातांत अचूक कशी पडावी, ही गोष्ट त्याला विशेषच भंडावून सोडीत होती. त्याला पक्कं आठवत होतं, कीं नेहमींच्या सुरक्षित मार्गानं हें चिठीचं टपाल रवाना झालं होतं. मग तें मध्येंच ‘ टॉर्पेडो ’ कसं व्हावं ? ही गफलत व्हावी कशी ? त्या पोरीच्याच हातून नाहीं ना कांहीं हलगर्जीपणा झाला ? तिनं ती चिठी निष्काळजीपणानं दिली असेल फेकून अन् ती पडली असेल तिच्या त्या दिव्य वडिलांच्या काकदृष्टीला ! हे पोरींचे बाप लेकाचे टपूनच बसलेले असतात असं कांहीं शोधायला ! आपल्या पोरींना कोण चिठ्याचपाठ्या पाठवतो, हें हुडकण्याखेरीज दुसरा उद्योगच नाहीं या म्हाताऱ्यांना ? अन् ती चिठी तरी काय,— मोठी लांबलचक प्रणयपत्रिका थोडीच होती ?–नुस्तं ‘ तुझी भेट व्हावी

अशी अपेक्षा करतों आहें, –तो चातक का कोण तो, त्या पक्षासारखी वाट पाहतों आहें ' हीं एवढीं चार अक्षरं लिहिलेलीं होती त्या चिठींत. त्यानं एवढं ह्या म्हाताऱ्याचं पित्त कां खवळावं ? अन् आतां हा म्हातारा म्हटल्या-प्रमाणं खरोखरच बंदी करणार असेल तर आतां त्या " वंडरफुल " पोरीचं दर्शनसुद्धां घडतांना मारामारच पडणार म्हणायची !–हाः तें दर्शन; हृदयांत कांहीं तरी उसळवून टाकणारं तें दर्शन...

शिनू एकदम दचकला ! दाराची कडी बाहेरून इतक्या जोरानं खडखडावलेली त्याला ऐकूं आली, कीं त्यासरशीं कॉटवरून त्यानं ताडकन् उडीच घेतली ! आणि मग दार उघडून त्यानं, उंदरावर उडी घेण्याच्या बेतांत असलेल्या मांजराप्रमाणं बाहेर रोखून पाहिलं.

आणि मग त्याची चर्या एकदम पालटली ! जणू काय उंदराऐवजीं त्या मांजराला तिथं अकस्मात् वाघ्या कुत्राच दिसूं लागला होता ! डोळ्यांना पराकाष्ठेचा ताण देऊन शिनू ओरडला, " ओ ऽ ऽ ऽ, तूं आलीस ? "

" हं !–" एवढाच हुंकार देऊन उत्तरेनं आंत प्रवेश केला. तिच्या मुद्रेवरील तें नेहमीचं गोड स्मितही शिनूला आज तिथं दिसूं शकलं नाहीं. तिच्या रुष्ट नेत्राकडे पाहात तो उद्गारला,

" अं !—पण तूं कशी येऊं शकलीस ? मला वाटलं होतं—"

" आलें कशीही. " गाल फुगवून उत्तरा मध्येंच म्हणाली, " मला नाहीं कोण अडवीत ! "

" अं ? " शिनू पुन्हां डोळे रुंदावून म्हणाला, " काकासाहेबांनीं कांहीं नाहीं सांगितलं तुला ? "

" सगळं सांगितलं !–"

" सगळं सांगितलं ? " शिनू ओरडला, " मग–मग–"

" मग कांहीं नाहीं ! तुम्ही मात्र कृपा करून मला यापुढं चिठ्या पाठवीत जाऊं नका !—"

" अं ? तूंही काकासाहेबांसारखंच म्हणायला लागलीस अं ? "

उत्तरेनं त्यावर चंबूसारखे ओंठ करून मानेला एकदोनदां नाजुक हिसके दिले आणि ती उद्गारली,

" एक क्षुल्लक चिठीही सरळ सारखी पाठवतां येत नाहीं न्—"

" असं काय बरं ? " शिनू मध्येंच म्हणाला, " यांत तुझाच नाहीं का अव्यवस्थितपणा ?—"

" माझा ? —"

" हं–कुठं तरी टाकून दिली असशील तूं चिठी अन् ती पडली अचूक काकासाहेबांच्या हातांत—"

" काकासाहेबांच्या हातांत अचूक पडली एवढं अगदीं खरं !–पण ती माझ्या अव्यवस्थितपणामुळं नव्हे,—तुमच्या –तुमच्या धांदरटपणामुळं !"

" अं ?—"

" चिठी मला न् लखोटा चक्क काकासाहेबांच्या नांवाचा !—"

" चक्क काकासाहेबांच्या नांवाचा ? " शिनू पुन्हा ओरडला, " शक्य नाहीं !— "

उत्तरेनं पुन्हां एकदां ओंठाचा व मानेचा तो विशिष्ट चाळा केला आणि ती म्हणाली, " शक्य नाहीं म्हणे ! पुराव्याशिवाय नाहीं आल्यें मीं इथं ! हें कुणाचं अक्षर ? लागतं का ? "

तिनं आपल्या पर्समधून एक लखोटा काढून त्याच्या डोळ्यांसमोर धरला आणि मग ती म्हणाली, " तरी बरं काकासाहेबांनाच नाहीं लिहिलंत, चातकासारखी वाट पाहत आहें, मला येऊन भेटा म्हणून ! "

शिनूच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. आपल्याच हातून घाईच्या भरांत ती चूक घडून आली, हें त्याच्या लक्षांत येऊन चुकलं. त्यानं भुंवया आकुंचित करून त्या लखोटयाकडे पाहिलं आणि तो उद्गारला, "अरेचा !"

" अन् असं व्हायचं कारण ठाऊक आहे का ! "

" अं ? "

" तें क्रॉसवर्ड ! "

" क्रॉसवर्ड ?–त्याचा काय संबंध याच्याशीं ? "

" त्यामुळंच हा धांदरटपणा घडला तुमच्या हातून! माझं नांवसुद्धां विसरून गेलां त्या धुंदींत! तरी मी सारखी सांगतें आहें, ह्या वेडपटपणानं कांहीं वळायचं नाहीं!—"

शिनूला उत्तरेची ती मीमांसा मुळींच रुचली नाहीं. तो दोनदां चुत्कारला आणि मान हालवून म्हणाला, " अंहं! क्रॉसवर्डचा याच्याशीं कांहीं संबंध नाहीं, उत्तरा! उगाचं तुझा डोळा आहे त्याच्यावर! मनुष्य कामाच्या गर्दीत असला कीं त्याच्याकडून होतात कधीं कधीं अशा ' स्लिप्स'! त्याला त्याचा काय इलाज असतो का?"

" तर-तर!-भाऊगर्दीच झाली आहे ना नुसती कामाची!-पण कितीही काम असलं, तरी मनुष्य कांहीं काकासाहेबांच्या नांवाचा नाहीं जप करीत बसायचा!"

शिनू पुन्हां चुत्कारला आणि म्हणाला,

" च्, च्, साफ-साफ चुकतेस तूं, उत्तरा!"

" मीं नाहीं चुकत! तुम्हीच सारख्या चुका करीत आहां!" उत्तरा लगेच झणकाऱ्यानं म्हणाली, " काकासाहेबांना काय सांगितलंत, पोरी आपल्या वडिलांशीं भांडतात म्हणून?—"

शिनू एकदम भुंवया ताठून ओरडला, " कुणी सांगितलं?"

" तुम्ही सांगितलंत!"

" आय मीन, आय मीन, काकासाहेबांनींच सांगितलं ना तुला हें?"

" हो, काकासाहेबांनींच सांगितलं; तुम्ही त्यांच्याजवळ भलतंच कांहीं तरी बडबडलांत तें!"

" च्-च्-" शिनू पुन्हां एकदां चुत्कारून म्हणाला, " भलतंच नव्हे, उत्तरा!"

" तर काय शहाणपणाचं?"

" च्-तूंच पाहा स्वतः वाटलं तर! मग तुला समजेल तोच शब्द जुळतोय का नाहीं तिथं तो?"

इतकंच म्हणून शिनूनं हँगरवर टांगलेल्या कोटाच्या खिशांतून चटकन् कोडयांचे कागद काढले आणि उत्तरेपुढं ते उलगडून धरीत तो म्हणाला,

" पाहा, थर्टिसिक्स ॲक्रॉस–ए गर्ल इज ॲप्ट टु क्वारल वुइथ धिस— "

" काय आहे हें ? " भुंवयांच्या कमानींना अधिकच बांक देऊन उत्तरेनं मध्येंच विचारलं.

तिच्या त्या भुंवयांच्या सुंदर मोडणीकडे पाहत तो उत्तरला,

" क्रॉसवर्ड ! "

" फेकून द्या तें !—मला नाहीं पाहायचंय् ! "

" अँ ! फेंकून द्या ? "

" हं–सरळ फेकून द्या केराच्या टोपलींत ! " आणि केराची टोपली तिथं आसपास कुठं दिसते कीं काय हें पाहण्यासाठींच जणूं आसपास नजर फेंकून मग ती पुढं म्हणाली, " नाहीं, तर गटारांत !— "

" अं !–पण–पण जस्ट सी !— "

जोरानं मान हालवून उत्तरा म्हणाली,

" मला तुमचं हें क्रॉसवर्ड पाहायचं नाहीं ! "

" क्रॉसवर्ड पाहूं नकोस, पण डॅड हा शब्द तिथं जुळतो कीं नाहीं तें तर पाहा ना ! "

" डॅड शब्द जुळत नाहीं ! "

" पण मीं म्हणतों, तोच शब्द लागू पडतोय् तिथं ! ' क्ल्यू ' पाहा कीं ए गर्ल इज ॲप्ट टु क्वारल— "

" ए गर्ल डझन्ट क्वारल वुइथ एनीवन !— "

" पण—पण—हा शब्द— "

" मग घेऊन बसा तोच शब्द ! " उत्तरा उसळून म्हणाली, " या क्रॉसवर्डनं तुम्हांला नुसतं मॅड करून सोडलंय् !— "

" नो—नो—नॉट मॅड ! "

" मॅड नाहीं तर कॅड !— "

" च्-च्-तुला कल्पना नाहीं, उत्तरा !" शिन् घाईघाईनं म्हणाला, " ह्याची किंमत पंचतीस हजार निदान साडेबारा हजार रुपये तरी खास आहे ! पहिल्या बक्षिसाची ही आयती आलेली संधि-आपण उगाच कां दवडावी !—आय टेल यू--तूंही पाठव तुझ्या नांवावर हेंच सोल्युशन !-- ए व्हेरी नाइस आयडिया ! अर्धे बक्षिस तुला न् अर्धे मला !"

असं म्हणून त्यानं तिच्या पर्समध्यें उत्तराचा कागद घालून ती तिच्या हातांत दिली. पण ती टेबलावर आपटून उत्तरा म्हणाली,

" शुद्ध जुगारडे आहांत ! म्हणे पहिलं बक्षिस येणार आहे ! मला नव्हतं वाटलं, इतक्या थराला तुमचं वेड जाईलसं !-जातें मीं ! तें तुमचं क्रॉस-वर्ड चालू असेपर्यंत मला तुमचं तोंडही पाहायचं नाहीं !"

एवढंच म्हणून ती जरासुद्धां मागं न पाहतां तशीच झटक्यासरशीं दारा-बाहेर पडली. इतक्या तडकाफडकीं ती अदृश्य झाली, कीं शिनूला कांहीं क्षण जणूं काय तो एक चमत्कारच भासला ! सुमारं मिनिट-दोन मिनिट तो डोळे विस्फारून त्या उघडया दरवाजाकडे नुसता पाहतच राहिला !

पण उत्तरेच्या त्या तडकाफडकीं वर्तनाचं त्याला प्रथमतः जितकं आश्चर्य वाटलं, तितकाच मग तिचा रागही आला. एकाद्याचं एकाद्या मुलीवर अतिशय म्हणजे अगदीं बेफामही प्रेम असलं म्हणून वाटेल तशीं उत्तरं तिनं त्याला देणं योग्य होईल का ? असाच सवाल त्याचं मन त्याला करूं लागलं. अन् हीं उत्तरं-त्याचं मन त्याला पुढं सुनवूं लागलं-एकाद्याचं म्हणणं पुरतं ऐकूनसुद्धां न घेतां द्यावीं न् वर तिनं त्यालाच दोष द्यावा, याला साधा न्यायही म्हणतां येईल का ? श्रीमंत बापाचा गुण किती झालं तरी थोडाफार तरी त्यांच्या पोरींत उतरल्यावांचून राहत नाहीं हेंच खरं ! ताडकन् एकाद्याचा अपमान करायला त्यांना कांहींही वाटत नाहीं. तिच्या त्या महाशिष्ट बापानं भर हॉटेलांत मघां आपली छान शोभा केली नी आतां या पोरीनं त्याच्यावरही ताण केली. त्यापेक्षां--

--शिनूची मुद्रा एकदम अतिशयच गंभीर झाली. त्यानं तत्क्षणींच

निश्चय करून टाकला, कीं अशा पोरीची आतां या उपर चुकूनसुद्धां चौकशी करायची नाहीं अथवा तिची भेटही घ्यायचा प्रयत्न करायचा नाहीं! एक दीर्घ श्वास घेऊन त्यानं मग आसपास दृष्टि फेकली. तों टेबलावर तशीच पडलेली उत्तरेची ती पर्स त्याच्या दृष्टीला पडली. त्यानं पटकन् ती पर्स उचलली आणि तिचं सुद्धां आतां दर्शन नको असा विचार करून गड्याला हांक मारून त्यानं ती उत्तरेच्या घरीं नेऊन द्यायला सांगितलं.

पुरे चार दिवस त्यानं ती आपली प्रतिज्ञा यत्किंचित्‌ही ढळूं दिली नाहीं. पण हे चारही दिवस त्याला असे कांहीं चमत्कारिक गेले, कीं दोन दिवसांत तो कोड्याचं उत्तर पाठविणार होता, तोसुद्धां बेत त्यानं अखेरच्या तारखे-पर्यंत लांबणीवर टाकला. शिवाय आतां त्याला त्या कोड्याबद्दल उत्साहही कसा तो वाटेना. जिच्यासाठीं हा सारा उपद्‌व्याप करायचा, तिनंच असं साफ तोंडघशीं पाडल्यावर आतां हा खटाटोप करायचा तरी कशासाठीं, असंच त्याचं मन त्याला आतां वारंवार सांगूं लागलं. मग मग तर या क्रॉसवर्ड कोड्याचा विचारही त्याला नकोसाच वाटूं लागला. क्रॉसवर्ड कोड्याच्या त्या पानांतील प्रत्येक चौकोनांत उत्तरेची ती रम्य हंसरी छबीच त्याला सारखी दिसूं लागली.

आणि मग पांचव्या दिवशीं त्याच्या विचारांनीं निराळीच कलाटणी घेतली. त्याच्या मनांत हळूच विचार डोकावला, आपलंच नाहीं का चुकलं मुळापासून?—हो, त्या चाणाक्ष न् दूरदर्शी पोरीनं आपल्याला प्रथमच सूचना देऊन ठेविली नव्हती का, कीं या क्रॉसवर्डच्या त्या म्हाताऱ्याकडे कांहीं उपयोग व्हायचा नाहीं म्हणून! तें तिचंच म्हणणं अगदीं खरं ठरलं. बापाचा स्वभाव तिला अधिक कळायचा कीं आपल्यासारख्या तिऱ्हाइताला कळायचा? पण क्रॉसवर्डच्या त्या जबरदस्त आकर्षणाच्या भरांत ही साधी गोष्टही आपल्या लक्षांत येऊं शकली नाहीं! अन् मग त्या नादामुळंच ते एकेक विचित्र बनाव घडून आले. त्या नादाची मोहिनी आपल्यावर पडली नसती, तर तो दुर्दैवी दिवस आपल्या आयुष्यांत उगवलाच असता

कशाला ? अन् ती चिठीही भलत्याच नांवानं लिहिण्याची चूक.आपल्या हातून झालीच असती कशाला ?

त्या दिवशीं आपण आपली चूक कबूल करायच्या ऐवजीं उगाच तिच्याशीं वाद घालीत बसलों, असंही त्याला वाटूं लागलं. अणि मग त्याच्या मनांत उसळूं लागलेल्या या नव्या विचारांचा परिणाम शेवटीं असा झाला, कीं त्यानं कोडयाचं तें उत्तर पाठविण्याचा बेत तर साफ रद्द केलाच; पण त्या कोडयाच्या नादीं लागून उत्तरेला जो विनाकारण मनस्ताप दिला, त्याबद्दल तिची मनःपूर्वक क्षमाही मागायचं त्यानं ठरविलं आणि लगेच तिला तसं पत्रही लिहायला तो बसला.

या पत्रांत त्यानं तिला स्पष्टच लिहून कळविलं होतं कीं—

" 'क्रॉसवर्ड' कडे यापुढं ढुंकूनही न पाहण्याची मीं शपथ घेतली आहे. अन् या माझ्या शपथेची खूण पटविण्यासाठीं पूर्वीच्या कोडयांत बक्षिस म्हणून आलेल्या एक रुपयाच्या व्हाउचरचे व तसेंच 'मेरिट बोनस' म्हणून आलेल्या दुसऱ्याही व्हाउचरचे माझ्या हातांनीं केलेले तुकडेच यासोबत मीं पाठवून देत आहें. या दोन्ही व्हाउचर्सचा उपयोग चालू कोडयाचं उत्तर पाठविण्यासाठीं मीं करणार होतों. पण माझ्या शपथेला अनुसरून तें उतरही मी अर्थातच फाडून टाकलं आहे आणि त्याचेही तुकडे मीं या पाकिटांत घालीत आहें; यावरून या कोडयांचा आतां मला किती तिटकारा वाटूं लागला आहे, याची तुला कल्पना येऊं शकेल, अशी मला खात्री वाटते."

त्यानं पुढं असंही लिहिलं होतं कीं,

" त्या कोडयांतला डॅड हा शब्द योग्य आहे, असं अजूनही मला वाटत असलं, तरी त्याबाबतही मीं आतां कांहींच आग्रह धरूं शकत नाहीं. काकासाहेबांनीं अन् तूं प्रत्यक्ष उदाहरणानं तो शब्द खोटा असल्याचं सिद्ध करून दिलंच आहांत; तेव्हां प्रत्यक्ष अनुभव खोटा कसा म्हणायचा ? यावरून पुनः हेंच सिद्ध होत आहे कीं हे 'क्रॉसवर्ड' वाले निव्वळ बनवाबनवी करीत असतात. त्यांच्या नादीं लागणारा शेवटीं मूर्खच ठरायचा !"

पूर्वीची चूक होऊं नये म्हणून शिनूनं त्या पत्रावर स्वच्छ टाइपरिटन

अक्षरांत घातलेलं उत्तरेचं नांव पुनः पुनः वाचून पाहिलं आणि मग तें त्यानं नेहमीप्रमाणं गड्याबरोबर न पाठवितां सरळ तिकिटं लावून पोस्टांत टाकलं. आणि त्या पत्राचं उत्तर येईल अशी जरी त्याला आशा वाटत नव्हती, तरी त्या दिवसापासून रोज तो पोस्टमननं आपल्या खोलींत कांहीं एकादं कार्ड किंवा पाकिट टाकलं असेल काय, या अपेक्षेनं दारापासचे कोंपरे चारचारदां धुंडाळूं लागला! पण प्रत्येक वेळीं निराशाच त्याच्या वांट्याला येऊं लागली.

पांचव्या का सहाव्या दिवशीं ंध्याकाळीं हपिसांतून तो घरीं आला, त्या वेळीं नेहमींप्रमाणंच त्यानं दाराच्या कोंपऱ्याकडे मुद्दामच पाहण्याचं टाळलं. पण दरवाजांतच पडलेला तो पांढरा शुभ्र लिफाफा मात्र त्याची दृष्टि मुळींच चुकवूं शकला नाहीं! नकळतच त्याच्या हातांनीं त्या लखोट्या-वर एकदम झडप घातली आणि त्याच्या कडा टर्रकन् फाडून त्यांतील पत्राचा कागद त्यानं बाहेर काढला!

पण पत्राच्या पहिल्याच अक्षरांवरून नजर फिरवतांच शिनू बुचकळ्यांतच पडला! त्यानं लिफाफ्यावरील पत्त्याकडे डोळे फाडफाडून पाहिलं. पण तिथं तर चक्क आपलंच नांव उत्तरेच्या त्या गोलगोल अक्षरांत लिहिलेलं त्याला दिसत होतं! त्यानं पुन्हां पत्रावरील मायना पाहिला, तो मात्र 'ती. काकांस' असाच होता. शिनूला चटकन् शंका आली, आपण काकासाहेबांच्या नांवं ती चिठी धाडली, त्याची भरपाई करण्यासाठींच चेष्टेनं मुद्दाम कदाचित् तिनं हा मायना लिहिला नसेल ना! पण पुढच्या शब्दांनीं त्याची ती शंकाही ताबडतोब फिटविली. उत्तरेनं तें पत्र आपल्या वडिलांनाच खरोखरीं उद्दे-शून लिहिलं असल्याचं त्याला आढळून आलं. त्याला मग पत्राचा पुढचा भाग वाचून पाहण्याचा मोह आवरेना. उत्तरेनं काकासाहेबांना लिहिलं होतं:

" आज टाइम्सच्या अंकांत प्रसिद्ध झालेलं नाताळच्या कोड्याचं उत्तर तुम्हीं पाहिलंच असेल; तें उत्तर श्रीनिवासरावांच्या उत्तराशीं तंतोतंत जुळतं आहे; तेव्हां पंचवीस हजारांचं पहिलं बक्षिस त्यांनाच मिळणार हें नक्की झालंच आहे."

डोक्यांत एकाएकीं जोराचा कुणी घण मारावा तसंच शिनूला क्षणभर होऊन गेलं. तो त्या अक्षरांकडे डोळे विस्फारून पाहतच राहिला. क्षण-मात्र, त्याच्या डोक्यांत शंका चमकून गेली, ही सारी थट्टाच चालवली नसेल ना त्या मिस्किल पोरीनं ? ' क्रॉसवर्ड ' कडे ढुंकूनही न पाहण्याची शपथ घेतल्यामुळं आदल्या दिवशींच्या ' टाइम्स ' मध्यें प्रसिद्ध झालेलं कोडयाचं तें उत्तर पाहायची त्याला गरजच राहिली नव्हती आणि यामुळं आपलं उत्तर बरोबर आलं आहे किंवा काय याचीही त्याला कांहींच जाणीव नव्हती आणि आतां खात्री करून घ्यायला त्या दिवसाचा टाइम्सचा अंकही त्याच्या हाताशीं नव्हता. पण उत्तर जुळत असलं तरीही आतां त्याचा काय उपयोग, असा विचार करून त्यानं एक दीर्घ निःश्वास टाकला. आणि मग पत्रांतील पुढील शब्दांकडे त्यानं नजर फेकली. उत्तरेनं लिहिलं होतं—

"...हें नक्की झालंच आहे ! मीं त्या दिवशीं तुम्हांला सांगितलं तें आठवत असेलच. त्यांचंच उत्तर बरोबर असेल असं मीं सारखं सांगत होतें; पण तुम्ही त्यावर म्हणालांत, ' त्या रेम्याडोक्याचं काय येणार आहे उत्तर बरोबर ? आम्हीं आज पंधरा वर्षं हीं कोडीं सोडवतोंय, तरी चार चुकांपलीकडे आमची मजल जात नाहीं ! ' जें तुम्हांला पंधरा वर्षं साधलं नाहीं, ते या ' रेम्याडोक्या ' नं दोन महिन्यांत साधलं ! यावरूनच माझी निवड तुमच्या दृष्टीनं पाहिलं तरी किती योग्य आहे हें आपोआपच सिद्ध होतंय् ! मला हा कोडयांचा नाद मुळापासून आवडत नाहीं, हें तुम्हांला ठाऊकच आहे. अन् मीं त्यांनाही तसं निक्षून सांगितलं होतं; पण मला एक खात्री होती कीं बुद्धिमान् मनुष्य कोणत्याही क्षेत्रांत पडला तरी तिथं आपल्या बुद्धीची चमक दाखविल्याविना राहायचा नाहीं. त्याचं हें प्रत्यंतर ताबडतोबच मिळालं ! आतां तरी तुमचा आशीर्वाद आम्हांला मिळेल अशी मी आशा करूं का ? अधिक लिहित नाहीं.

तुमची,

**उत्तरा** "

शिनूनं तें पत्र आणखी एकदां वाचून पाहिलं. पण त्याच्या डोक्यांत उडालेला गोंधळ मुळींच दूर होईना. काकासाहेबांनाच तें पत्र उत्तरेनं लिहिलं होतं, याबद्दल त्याला शंका राहिली नव्हती; पण मग तें पत्र आपल्या पत्त्यावर कसं आलं ? शिवाय तिचं हें पत्र पुण्याहून आलेलं दिसत होतं; अर्थात् ती तिकडे गेली असावी असा त्यावरून तर्क करतां येत होता. पण मग आपलं पत्र तिला पोंचलं कीं नाहीं ?—शिवाय—शिवाय तिच्या ह्या पत्रांतील साऱ्या गोष्टी खऱ्या असल्या तरी त्याचा आतां काय उपयोग ? आपण तर कोडयाचं उत्तर पाठवलंच नाहीं !—

डोक्यांत माजलेलं विचारांचं तुफान शांत करण्यासाठीं शिनूनं लांबवरून एक चक्कर मारून यायचं ठरवलं. पण बाहेर पडतां पडतां त्याला आठवण झाली, कीं आपल्या नांवं आलेलं काकासाहेबांचं पत्र त्यांना नेऊन देणं आपलं कर्तव्यच आहे; शिवाय त्यांचा त्यावरून जो गैरसमज व्हायचा संभव आहे, तोही त्या वेळींच दूर करून टाकणं रास्तच होईल. कारण आपण पंचवीस हजारांचे मालक नसल्याचा खरा प्रकार बक्षिस मिळालेल्यांचीं नांवं थोडयाच दिवसांनीं जेव्हां प्रसिद्ध होतील, तेव्हां बाहेर फुटणारच आहे. तोंपर्यंत निष्कारण त्यांच्या दृष्टीनं मालक म्हणून मिरवण्यापेक्षां अगोदरच ह्या गैरसमजाचं निराकरण करून टाकणं योग्य नव्हे का ?–आणि असा सरळ प्रामाणिकपणाचा विचार करून त्यानं काकासाहेबांच्या निवासस्थानाकडेच आपले पाय वळवले.

दहा बारा दिवसांपूर्वीच, काकासाहेबांच्या ह्याच फ्लॅटमध्यें, कोडयाचं बक्षिस संपादणारा भाग्यवान् वीर म्हणून उत्तरेसह प्रवेश करायची सुख-स्वप्नं तो अनुभवीत होता; पण आज, तो भाग्यवान् वीर मी नव्हे, असा खुलासा करण्यासाठीं तो या घराच्या दरवाज्यापाशीं येऊन उभा राहिला होता ! शिनूला या विचित्र योगायोगाची त्याही स्थितींत थोडीशी गंमत वाटल्यावांचून राहिली नाहीं ! दारावरील घंटेचं बटन त्या भरांत त्यानं जरा जोरानंच दाबलं आणि त्या जोराच्या खणखणाटामुळंच कीं काय,

दार झटकन् उघडलं जाऊन स्वतः काकासाहेबांचीच स्वारी दारांत अवतीर्ण झालेली त्याला दिसून आली !

काकासाहेबांच दर्शन होतांच शिनूनं अतिशय गंभीर मुद्रा केली, आणि तो म्हणाला, " मी श्रीनिवास चिरमुले !–"

" होय, होय ! " काकासाहेब चटकन् उत्तरले, " ओळखलं मीं तुम्हांला ! या ना, आंत या !–"

पण शिनू दारांतच घुटमळत म्हणाला, " माझं फारसं काम नाहीं आपल्याकडे; फक्त हें पत्र द्यायचं आहे आपल्याला !–"

" कुणाचं पत्र ! "

त्यांच्या हातांत उत्तरेचं पत्र देत शिनू म्हणाला,

" तुमचं ! माझ्या नांवावर चुकून धाडलं असावं उत्तरेनं, असं वाटतं ! "

" अरे अरे ! खरं कीं काय ?" काकासाहेब विस्मयानं ओरडले, " अरे हो, पण तुम्ही खरंच दिलंत सोडून !–अगदीं सोडून दिलंत !–"

" ऑं ! सोडून दिलं ! "

" हं ! कालचं कोडं पाठवलं नाहींत तुम्हीं ? –कोड्याचा नाद खराच सोडून दिलात ?—"

" हं–" शिनू काकासाहेबांच्या चेहऱ्याकडे विस्फारल्या नेत्रांनीं पाहत म्हणाला, " पण तुम्हांला कसं कळलं ?—"

" कसं कळलं ?—कसं कळलं म्हणजे उत्तरेनं लिहिलंय् नाहीं का त्या पत्रांत !—"

" पत्रांत ?—"

" हं—तिचं पत्र आज आतांच आलंय् तें ! " काकासाहेब ओठांना विसांवा न देतां म्हणाले, " पण तुम्ही हा नाद सोडून दिलात ?–अरे, अरे ! तुम्ही अलीकडचीं पोरं अतिशय विचित्रच दिसतां मला !–आज पंधरा वर्षं मला हा नाद सोडवत नाहीं अन् तुम्ही त्या पोरीनं सांगतांक्षणींच, बरोबर आलेलं उत्तर देखील पाठवायचं रद्द केलंत ! कमाल आहे !–इतकं वाटतं तुम्हांला त्या पोरीबद्दल ! "

शिनूनं नुसताच हुंकार दिला आणि तो उद्गारला, " पण--पण--पत्र--"

पण काकासाहेब लगेच पुढं म्हणाले, " यस्, यस् !--तिचं तें पत्र माझ्या नांवानं आलंय्; पण लिहिलंय मात्र तुम्हांला, अन् हें मला धाडलेलं पत्र तुमच्या पत्त्यावर पाठवलंन् ना ! छान, छान ! इतकी गडबडून गेली अं पोर ती ! "

आतां मात्र शिनूला दारांतच घुटमळत राहणं योग्य वाटेना. चटकन् आंत एक पाऊल टाकून तो ओरडला, " अं ? माझं पत्र ? "

" हो ना, कोडयाचं पहिलं बक्षिस आपल्याला मिळाल्याचं समजतांच त्या गडबडींत कुणाचं पत्र कुणाला घालायचं याचं भानच राहिलं नसावं त्या पोरीला !--या ना, आंत या ना ! तुम्हांला तें पत्रच दाखवतों कीं ! "--

लगबगीनं काकासाहेब आंत गेले आणि क्षणभऱ्यांतच एक पत्र घेऊन येऊन शिनूच्या तें हातांत देत ते म्हणाले, " हें तुमचं पत्र ! "

शिनूनं अधीरपणं हातांतील पत्राची घडी उलगडली आणि अधाशीपणं त्यांतील प्रत्येक शब्द तो भराभर डोळ्यांखालून रेटूं लागला. उत्तरेनं त्याला लिहिलं होतं:

" तुमचं पत्र अन् त्यांतील कपटे नुकतेच मला मिळाले. मुंबईहून तें पत्र रीडायरेक्ट करून इथं पाठवावं लागल्यामुळं इतक्या उशीरा मिळालं. यापूर्वीच मीं तुम्हांला पत्र लिहिणार होतें; पण पाहूं म्हटलं, माझा राग किती दिवस चालवून घेतला जातो तो ! खरंच, इतका का राग आला आहे माझा ? त्या दिवशीं किनई, कसं कुणाला ठाऊक, पण भांडणाचंच वारं माझ्या अंगांत संचारलं होतं ! तिथं मीं आलें होतें ती सुद्धां काकांबरोबर जवळजवळ भांडूनच आलें होतें. तुमच्या त्या कोडयांचा खरोखरच मला इतका संताप आला होता--अन् त्या भरांत मीं दुसऱ्या दिवशीं पुण्याला ताईच्या इथं जाणार आहें, हेंही सांगायचं विसरूनच गेलें. इथं आल्यानंतरही, खरं सांगायचं म्हणजे, दोन दिवस तुमच्याविषयींचा माझा राग गेला नाहीं. अन् मग एके दिवशीं माझ्या त्या पर्समध्यें तुम्ही ठेवून दिलेला

तुमच्या उत्तराचा कागद जेव्हां माझ्या हाताला सहज लागला, तेव्हां एकदम कसं कुणाला ठाऊक, पण मला सारखं वाटायला लागलं, कीं त्या दिवशीं भलताच आचरटपणा आपल्या हातून घडला! तुम्ही तरी तो कोडयाचा नाद माझ्यासाठींच लावून घेतलात ना! त्यांत वास्तविक तुम्हांला मीं मदत करायची, तर मीं उलट हेकेखोरपणानं तुमच्या आडच यायला लागलें! न् मग तुमचे शब्दही मला एकदम आठवले–' अर्धं बक्षिस तुला, अर्धं मला!' ही भागीदारीची सुंदर कल्पना तुम्ही प्रेमानं सुचवलीत न् मीं ती झिडकारून टाकली! याचंच मला फारफार वाईट वाटायला लागलं, न् मग मला सुचलं, कीं ही सुंदर कल्पना अजूनही आपल्याला अंमलांत आणतां येईल!–तुमच्या कोडयाचं उत्तर माझ्या हातीं होतंच, तेंच लिहून द्यावं पाठवून आपल्या दोघांच्या नांवांवर, असा मीं विचार केला. आलं उत्तर बरोबर तर छानच झालं, नाहीं तर नुकसानीचीही अर्धी भागीदारी तुमच्याचप्रमाणं सोसावी! त्यांतल्या त्यांत कदाचित् थोडीशी गंमत करतां येईल, म्हणून तुम्हांला न कळवतांच हें करायचं मीं ठरवलं. अन् त्यामुळंच मीं आतांपर्यंत तुम्हांला कांहीं कळवलंही नव्हतं. पण काल टाइम्सच्या अंकांत आपलंच उत्तर बरोबर आल्याचं मीं पाहिलं, तेव्हां मला अतिशय आनंद झाला अन् केव्हां एकदां हें गौप्य फोडतें असं मला होऊन गेलं. तरी मीं मन आवरून बक्षिसाच्या नांवांची यादी येईपर्यंत वाट पाहायचं ठरवलं होतं; त्या वेळींच तुम्ही चकित झालां असतां, कीं खरी गंमत झाली असती! पण तितक्यांतच पोस्टमननं तुमचं माझ्या नांवाचं पत्र आणून दिलं. अन् त्यांतले ते कोडयाचा नाद सोडायची खूण म्हणून पाठवलेले व्हाउचर्सचे कपटेही मला मिळाले, तेव्हां–तेव्हां मग मात्र मला हें लिहिल्यावांचून राहवेनाच! तुम्ही कोडयाचं उत्तर केवळ माझ्याकरतां पाठवलं नाहीं, तरी दैवानं तुमच्याकरितां मला तें पाठवण्याची बुद्धि दिली. अर्थात् त्यांतील एक उत्तर माझ्या नांवानं गेलं, तरी तुमचंच आहे अन् काकांना आज जें निराळं पत्र मीं लिहिलं आहे, त्यांतही तसंच लिहिलं आहे. उद्यां संध्याकाळच्या गाडीनं मीं तिथं येणार आहें, त्या वेळीं आपण आणखी पुष्कळ बोलूंच!

शेवटीं आतां एवढंच सांगतें, कीं यापुढंही जर काका आपल्याला संमति द्यायला तयार नसतील, तर मग ' डॅड इज ध वर्ड !-' तुमचीच,

उत्तरा "

पत्र वाचून झाल्यावर शिनूनं मान वर करतांच काकासाहेब हंसत उद्गारले, " पाहिलंत वाचून ?-ती पोरगी मला थोडंसं बनवायला पाहत होती. पण दैवानंच तें पत्र माझ्या हातांत अचूक आणून दिलं !-बाकी आश्चर्य आहे, कोणताही नाद अगोदर सुटतांना कठीण असतो. त्यांत हा क्रॉसवर्डचा नाद विलक्षणच आहे. हेंच पाहा ना, ही पोर तुम्हांला सोडवायला गेली या नादांतून अन् स्वतःच त्याला बळी पडली !-पण तुम्ही मात्र त्या पोरीच्या शब्दासरशीं तो एकदम सोडून द्यायला तयार झालां ! तुम्ही अलीकडचीं पोरं हुरळलांत, कीं काय वाटेल तें कराल ! मला कल्पना नव्हती, इतकं कांहीं त्या पोरीबद्दल तुम्हांला वाटत असेल याची !-अरेच्या ! पण आपण इथं बोलतच राहिलों कीं ! उत्तरा यायची होती ना आतांच ! चला, येतां स्टेशनवर !—"

काकासाहेबांमध्यें झालेल्या त्या आकस्मिक परिवर्तनानें शिनू इतका चकित होऊन गेला होता, कीं पुन्हा मूकपणंच होकारार्थी मान हालवून त्यांना संमति देण्यापलीकडे तोंडानं कांहीं शब्द उच्चारण्याचंही त्याला भान राहिलं नाहीं. तो मंत्रमुग्धाप्रमाणं त्यांच्या मागं निघाला.

स्टेशनवरून घरीं आल्यानंतर शिनूशीं एकीकडे गप्पा मारायची संधि मिळतांच उत्तरा त्याला हळूच म्हणाली, " अहो बुद्धिवान् ! म्हटलं, आज एक धक्का बसला आहेच तुम्हांला ! उद्यां आणखी एक खायची तयारी ठेवा ! "

" म्हणजे ?— "

" वाईट गोष्ट सरळच सांगून ठेवलेली बरी ! तुम्हांला बक्षिस मिळालेलं नाहीं ! "

" हो, तुला मिळालंय् ! "

मान हालवून उत्तरा हंसत म्हणाली, " छत्-मलाही नाहीं! तुमचं उत्तर पाठवून मला बक्षिस मिळणार ?—त्यांत आहेत वीस चुका! फक्त तो डॅड शब्द तेवढा कसा चुकून बरोबर आला आहे!—"

" ऑं ?—"

" अय्या! तेंही पाहिलं नाहींत का तुम्ही! पण बरं झालं बाई! मला तीच भीति होती! तुमचं उत्तर पाहाल अन् बक्षिस माझ्या उत्तराला मिळालं नाहीं, म्हणून काकासाहेबांना सत्याच्या पुतळ्याप्रमाणं सांगाल; पण क्रॉस-वर्डला न शिवण्याचं वचन निष्ठेनं पाळलेलं दिसतंय्!—"

" मग कुणाच्या उत्तराला बक्षिस मिळालं?" शिनू अधीरतेनं म्हणाला.

" सांगतें काय-कुणाच्याच नाहीं! मीं उत्तरच पाठवलेलं नाहीं!—बक्षिसाचं तें सारं नाटक आहे!-तें पत्रांच्या अदलाबदलीचं सुद्धां नाटकच. बक्षिस मिळालं असतं तर पत्रं न धाडतांच ताबडतोब धांवत आलें असतें कीं! तुम्हांला काय वाटलं, मीं इतकी धांदरट आहें तुमच्यासारखी, एकाचं पत्र दुसऱ्याला टाकायला!' क्रासवर्ड' या शब्दावरून नी तुमच्या त्या गफलतीवरून मला ती कल्पना सुचली नी मुद्दामच टाकलीं मीं तीं तशीं बनावट पत्रं तयार करून! उगाच ही धांवत आलें का? त्या पत्रांचा परिणाम काय होतो हें पाहण्यासाठीं आलें मीं तश्या तांतडीनं! अन् तो अपेक्षितच झाला नाहीं का?—तुमच्या अचाट बुद्धीची चमक काकासाहे-बांना कळून आली अन् ते 'डॅड' शब्द खरा करायच्या भरीला न पडतां आशीर्वाद द्यायला तयार झाले!" असं म्हणून उत्तरा हंसूं लागली.

शिनू तिच्या मिस्किल चेहऱ्याकडे पाहतच राहिला. क्षणभऱ्यानं तो म्हणाला,

" पण मग मग ? बक्षिस आलं नाहीं म्हणजे!

" घाबरूं नका—त्याचीही केली मीं व्यवस्था!-"

" पंचवीस हजारांची!—"

" छेः! ते गमावले कसे हें सांगायची!"

" गमावले कसे?-" शिनू ओरडला.

" हो, त्यांत काय कठीण ! ही पत्राच्या अदलाबदलीची गफलत झाली, तशी ती गफलत होईल. उत्तर वेळेवर न पोंचल्यामुळं परत माघारीं आलं— कालच्या इलस्ट्रेटेड वुइकलींत नाहीं का एकानं हाच अनुभव सांगितला ? पोस्टांत टाकण्यासाठीं पत्र दिलेल्या गड्याचा हलगर्जीपणा नडला ! अन् याचा चकचकीत पुरावा म्हणून मीं खरोखरच प्रसिद्ध झालेलं बरोबर उत्तर भरून एक लखोटा कालच पाठविला आहे. तो कदाचित् येईल एक दोन दिवसांत इ ंच परतून ! त्या वेळचं नाटक करायची मात्र तयारी ठेवा !–"

विस्मयभरानें शिनू ओरडला,

" उत्तरा !–"

" अहो बुद्धिवान् ! म्हटलं,–हें आहें आपलं गुलाबी कोडं !–"

इतकंच म्हणून उत्तरा गालांतल्या गालांत हसूं लागली.

## प्रेम आणि आगगाड

“ मुइमुगाच्या उकडलेल्या शेंगां-पेक्षां भाजलेल्याच शेंगा अधिक गोड लागतात हं ! ” वासूतात्यांनीं पुड्यांतल्या टरफलांच्या ढिगांतून उरलेली एकुलती एक शेंग हातांत घेऊन तिच्याकडे प्रेमानं पाहत उद्गार काढले.

“ नाहीं तात्या ! उकडलेल्या शेंगेंत जी लज्जत, जें गोड पाणी असतं तें भाजलेल्यांत कधींच सांपडायचं नाहीं ! ” मोरूनानांनीं मोठ्या गंभीरतेनं आपला अभिप्राय प्रकट केला.

“ खरं सांगितलंस !” शिदूनाना मान हालवीत उद्गारले, “ आमच्या वेळीं ती उकडहंडी करीत असत ! अहाहा, काय त्याची गोडी सध्यांच्या या शहरांतल्या पोरांना हें कांहींच ठाऊक नाहीं ! ”

“ नाहीं कसं ?–अहो नाना, आगगाडींत काय थोडी उकडहंडी होते हल्लीं ! अन् हल्लींच्या पोरांना हीच उकडहंडी फार आवडायला लागली आहे, हें आपलं रेशनिंग न् सप्लाय सुरू झाल्यापासून !—” डोळे मिचकावीत सोन्याबापू म्हणाला.

“ न् बरं का नाना,—” राजाभाऊनं सोन्याची री ओढीत म्हटलं, “ या उकडहंडींतून प्रीतीच्या वाफेनं उकडलेले जे एकेक मजेदार बटाटे बाहेर पडतात, त्यांची ती रटमट तर अगदीं प्रेक्षणीयच असते हं ! आमच्या जी. ए. सेक्शनमधला तो हा–अहो, तो पोरगा भिवंडगांवकर–त्या लेकानं तर परवां मोठी मौजच केली कीं !—”

" काय केलंन् ?—सी. बी. ला पाठवायचं लेटर ए. जी. ला पाठवून दिलं ?—"

" का प्रेमपत्रच घुसडून दिलं त्यांत ? "

" कविबिवि नाहीं ना ?—नाहीं तर कविताच डिस्पॅच करायचा हपिसच्या पत्रांऐवजीं "

" छेः " राजाभाऊ एकेकाच्या तर्कशक्तीची कींव आल्याचा आविर्भाव करून म्हणाला, " साध्या गोष्टींत सुद्धां कुणाचींच डोकीं चालत नाहींत !—या भिवंडगांवकरानं कोणत्याशा एका पोरीला ' अपॉइंटमेंट ' दिली होती वाटतं !—न् ती पोरगी सरळ परवां आली कीं हपिसांत त्याची चौकशी करीत !—"

" खरं ?—भयंकर धीट झाल्या आहेत अं मुली या !—काय या लढाईनं क्रांति करून सोडली पाहा ! गेल्या लढाईमध्यें माणसाला आपलं लग्न ठरलंय् म्हणून सांगायला देखील किती लाज वाटत असे—न् आज या पोरी—"

" जाऊं द्या हो ! राजाभाऊच्या त्या पोरीचं काय झालं तें ऐका कीं पुढं ! "

" माझ्या नव्हे !" राजाभाऊ:चुकीची दुरुस्ती करीत म्हणाला, "भिवंड-गांवकराच्या—पण त्या पोरीचं कांहींच झालं नाहीं !—झाली सारी शोभा भिवंडगांवकराची ! "

" म्हणजे ?—ती पोरगी त्याच्या टेबलावरच जाऊन नाहीं ना बसली ? नेम नाहीं यांचा !—" आपल्या तुळतुळीत टक्कलावरून हात फिरवून शिदूनाना उद्गारले.

" नाहीं ! तितकी ती ' एक्स्ट्रा स्मार्ट ' नव्हती —अन् तसं कांहीं धास्ती वाटण्यासारखंही तिच्या चेहऱ्यामोहऱ्यावरून कांहीं दिसत नव्हतं !—"

" माशी देखील चेहऱ्यावरची हालत नसेल !—"

" हं, माशी देखील उडत नव्हती !—पण तिला पाहतांच भिवंडगांवकर मात्र जो उडाला, तो अचूक दुसऱ्या एका सेक्शनमधल्या लठ्ठ लेजराच्या

आड जाऊन पडला ! भिवंडगांवकराची ही आकस्मिक हालचाल कांहीं-जणांच्या नजरेला प्रथम आली नाहीं; पण नंतर ज्या वेळीं त्या पोरीनं सेक्शन सुपरिंटेंडंट भिवंडगांवकर कुठं आहेत म्हणून विचारायला सुरुवात केली, त्या वेळीं सर्वांनीं माना उंचावल्या, अन् मग ही स्वारी पटकन् कां लपली हें साऱ्यांच्या चटकन् लक्षांत आलं ! "

" कां ?—"

" कां ! अरे डिस्पॅच क्लार्कचा सुपरिंटेंडंट एका क्षणांत होत नाहीं !—"

" अस्सं ! म्हणजे भिवंडगांवकरानं त्या पोरीला एक लोणकढी ठेवून दिली होती तर ! अन् तें बिंग बाहेर फुटलं त्या वेळीं फार मौज झाली असेल, नाहीं ?--"

" मौज ! नुस्ती मौज नव्हे—मौजमजा ! त्याला त्या पोरीला गप्प करतां करतां पुरेवाट झाली !—"

" कां पण—? ही थापेबाजी कशाला हवी होती करायला ! "—मोरू-नाना खेदपूर्णतेनं म्हणाले.

" हल्लींच्या पोराच्या अंगांत ही थापेबाजी फार भिनली आहे ! कुठची पुरोगामी का काय म्हणतात ती ही शिकवण आहे का काय नकळे ! पण लेकाचे एक शब्द सरळ नाहीं बोलायचे ! "

" उदाहरणार्थ, आमच्या गोविंदरावांचा लाल्या ! " इतका वेळ पत्करलेली श्रोत्याची भूमिका सोडून देऊन जगूअण्णा उद्गारले.

" गोविंदरावांचा लाल्या ! म्हणजे तो फॉक्स वुल्फ कंपनींत आहे तो ?—"

" हं ! "—जगूअण्णांनीं विडीला तिसऱ्यांदा काडी पेटवून लावून म्हटलं, " फार दमट यायला लागला आहे हा पांढरा धागा हल्लीं ! "

" पण लाल्यानं काय केलं म्हणालांत ? "

" लाल्यानं !—गोविंदरावांच्या लाल्यानं ना ?—हातची बायको गमा-वली ! "

" म्हणजे ?—त्याचं लग्न झालं होतं ?—केव्हां ? कधीं ?—" वासुतात्यांनीं भुंवया विस्फारून विचारलं.

" झालं नाहीं !—व्हायचं होतं—पण तें मोडलं, या त्याच्या गाढव-पणामुळं ! हीं पोरं ' डुंप ' मारायला जातात, अन् तिथंच गोता खातात अचूक ! "—

" लाल्या " डुंप मारीत होता ! म्हणजे आहे तरी काय भानगड ही ? "

" सांगतों !—लेकाचा हा पांढरा धागा तानसा तलावांत वाळत घातला होता का काय नकळे ! "—सरकन् सहावी काडी पेटवून ती विडीला लावीत जगूअण्णा उद्गारले.

" पण लाल्या—! "

" होय, तेंच सांगतों !—हं; आतां पेटली हं !—" विडीचा एक दीर्घ दम मारून जगूअण्णा म्हणाले, " तर मी काय सांगत होतों—कीं हा आपला गोविंदरावांचा लाल्या ! पोरगं कसं आहे, ठाऊक असेलच तुम्हांला ! फॉक्स वुल्फ कंपनीमध्यें मोठ्या मेटाकुटीनं एका स्नेह्याचा वशिला मारून स्वारीला गोविंदरावांनीं तिथं चिकटवून दिलं होतं ! दरमहा पन्नास टिकल्या, अधिक पंधरा महागाई—फॉक्स वुल्फचा साहेब मोठा कडक आहे या बाबतींत !—"

" आग लावा त्या कंपनीला !—" शिदूनाना सात्त्विक संतापानं मध्येंच फूत्कारले.

" सूचना अगदीं योग्य आहे. पण त्यामुळं लाल्याला पुन्हां भटक्या मारायची पाळी येईल ती ! ती बाजू विचारांत घ्यायला हवी अन् आतांच्या लढाईनंतरच्या दिवसांत असले हे क्रांतिकारक विचार मनांत आणणं देखील ' डेंजरस 'च आहे ! पण मुद्द्याचा प्रश्न हा नाहीं. तेवढ्या त्या सत्तर ऐशीं रुपयांत लाल्या ' टिपटॉप ' राहण्याची कोशीस कशी करतो हें लक्षांत घेण्यासारखं आहे. याबद्दल त्याचं कौतुक करावं तितकं थोडंच होईल ! फॉक्स वुल्फ कंपनीचा सीनियर पार्टनर मॅग्रेलसाहेब याला देखील एके दिवशीं प्रश्न पडला म्हणे–( लाल्याच स्वतः सांगत होता हें मला एक दिवस ) कीं कंपनीचा साहेब मीं, कीं हा तिथं फायलिंग क्लार्कच्या खुर्चीवर बसला आहे तो ? चांगला दहा मिनिटं घोटाळला तो

अन् मग लाल्यानं त्याला ज्या वेळीं त्याच्या स्वतःच्या खुर्चीवर नेऊन बसवलं, त्या वेळीं मग त्याच्या डोक्यांत कुठं प्रकाश पडला !

" पण साहेबावर— जगूअण्णा पुढं सांगूं लागले ) एवढी छाप मारून राहिला होता लाल्या, तरी त्याच्या जीवाला त्यांत कांहींच समाधान वाटत नव्हतं ! त्याची मुख्य तक्रार फॉक्स वुल्फ कंपनींत अजूनही महिला कार-कून वर्गाला मज्जाव असावा ही होती. लढाईनं साऱ्या ठिकाणीं एवढी उलथापालथ करून टाकली–कोटांतलं एकही हपिस असं शिल्लक उरलं नाहीं कीं जिथं लांब शेपटा, उंच टांचेच्या चपला अन् व्हॅनिटी पर्स झळकूं लागली नाहीं–पण फॉक्स वुल्फ कंपनींत मात्र कचकड्याचा साधा आंकडाही अजून दिसूं शकत नव्हता !—

" खाणावळींतनं ( गोविंदरावांनीं पेन्शन घेतल्यानंतर नाशकाला कायम बिऱ्हाड केलं होतं ) रोज चार घास कसेबसे घशाखालीं उतरवून घाई-घाईनं नऊ–बत्तीसची ग्रँटरोड फास्ट गांठायची, हपिसपर्यंतच्या अवधींत दृष्टिपथांत येणाऱ्या शेपट्यांकडे ओझरती नजर टाकून सुस्कारे टाकायचे अन् पुन्हां तसाच कार्यक्रम सायंकाळीं परत फिरतांना उरकून कशीबशी खोली गांठायची, यापलीकडे मात्र अजून लाल्याची फारशी कांहींच प्रगति होऊं शकली नव्हती ! आगगाडींतील गांठीभेटींनं प्रीतीचा अंकुर फुटून त्याचा पुढं मोठा घवघवीत वृक्ष झाल्याच्या कथा त्यानं पुष्कळ वाचल्या होत्या. न् सिनेमांतूनही तीच तऱ्हा त्याच्या पाहण्यांत आली होती. पण प्रत्यक्षांत मात्र त्याच्या स्वतःच्या बाबतींत असं कांहींच घडत नव्हतं.–दोन चार वेळां कुणाच्या वेणींतून पडलेला आंकडा, कुणाचा विसर-लेला चिमुकला हातरुमाल त्यांच्या मालकांकडे पोंचता करून त्यानं त्यांच्या आभाराची प्राप्ति करून घेतली होती. कांहींचीं ट्रॅमचीं तिकिटंही काढलीं होतीं अन् चारदोघींचे चहाचे पैसे देण्याचीही संधि त्यानं साधली होती; पण ह्या अशा नामी संधि साधूनही त्याला त्याचा फलप्राप्तीच्या दृष्टीनं कांहींच उपयोग होऊं शकला नव्हता !

" पण पंचवीशीच्या वयानं थरारलेलं तरुण उत्साही, आकांक्षी मन

एकदोनदां पराजय सोसावा लागला, तरी तो कबूल करायला सहसा तयार होत नाहीं. लाल्याला तर अशा या परजयामुळं अधिकच ईर्ष्या चढे अन् तो नव्यानं आलेल्या संधीचा फायदा करून घेण्याचा दुप्पट जोमानं प्रयत्न करी. ' प्रेम अन् लढाई यांत सर्व कांहीं क्षम्य असतं ' ही उक्ति त्यानं तोंडपाठ केली होती. अन् ती कृतींत उतरतांना जरूर पडेल तेव्हां तसा बहाणा करायची न् थाप द्यायची त्याला युगतही साधून गेली होती ! ह्या अशा तंत्रानं आपण या प्रीतियुद्धांत सहज विजयी होऊं अशी आशाही त्याला वाटूं लागली होती.

"आणि अशा मोहिमेंत तो गुंतला असतांना ( जगूअण्णा पुढं म्हणाले )-अकस्मातच गोविंदरावांच्या पत्राचा ॲटम बॉम्ब लाल्यावर पडला ! लाल्याला त्यांनीं नाशकाला तावडतोब मुलगी पाहायला बोलावलं होतं !

" प्रेमावांचून लग्न ही आपत्ति लाल्याला भयंकर वाटली ! अगदीं सिनेमांतल्या नायकासारखीच ' सिच्युएशन ' त्याच्यापुढं उभी राहिली होती. बापलेकाचा तिथं जसा बहुधा लग्नाच्या बाबतींत-अर्थात् मुलाच्या-खटका उडतो, तसाच तो आतां आपल्यामध्यें उडणं अगदीं अपरिहार्यच होऊन बसलं आहे असंच त्याला वाटूं लागलं.

" पण त्याची ही प्रत्यक्ष सृष्टींतली पटकथा पूर्ण होण्याकरतां नायिकेची जरूरी होतीच. ती त्याला अजून मिळाली नव्हती. पण म्हणून काय झालं ? वडील माणसांना तरुणांच्या भावनांची कांहींच का कल्पना असूं नये ? लाल्याला गोविंदरावाच्या हिटलरशाहीची-( हा शब्द त्यानंच वापरला होता, ही कथा मला सांगतांना )-फार चीड आली; पण बापाला विरोध करणं त्याच्या बापाच्यानंही शक्य नव्हतं, म्हणून तो तसाच चरफडत नाशकाला जायला निघाला !

" अन् काय गंमत पाहा ! ज्या घटनेकरतां लाल्यानं आजवर इतक्या खटपटी लटपटी चालवल्या होत्या, ती घटना अचानक त्याच्या प्रवासांतच घडून आली-निदान लाल्याला तरी तसंच वाटलं ! गाडींत चढतांनाच्या

गर्दीत त्या तरुणीच्या म्हणजे लाल्याला जिनं आकर्षून घेतलं होतं, तिच्या पायांतलं चप्पल निसटून पडलं; त्यावर लाल्यानं सक्त पहारा करून तें तिला मिळवून दिलं आणि यावरूनच तिची अन् त्याची ओळख झाली. लाल्याच्या सांगण्याप्रमाणं असं दिसतं, कीं गर्दीत जरी त्या उभयतांना फारसं बोलतांच आलं नाहीं, तरी तिच्या डोळ्यांत जो भाव ( प्रेमाचा बरं का—) त्याला त्या वेळीं दिसला, त्यावरून तो म्हणतो, तिच्या हृदयाची ओळख पुरेपूर पटण्यासारखी होती. विशेषतः आपण नाशकालाच जात असल्याची माहिती तिनं त्याला जेव्हां विश्वासानं हंसत सांगितली, त्या-वेळीं तर त्याला याबाबत शंकाच उरली नाहीं ! न् मग यानंतर तिनं त्याला पुढं विचारलं,

" का हो ? नाशकांत नुक्तेच येऊन नेलेले नाना गटणे माहितीचे आहेत का तुमच्या ? "

नाना या आपुलकीच्या नांवानं तिनं उल्लेख केला, त्या अर्थी या व्यक्ती-बद्दल तिला बराच आदर न् आपुलकी वाटत असली पाहिजे हें लाल्यानं तावडतोब जाणलं अन् तो लगेच बोलून गेला—

" वा, नाहीं कसं ?—नाना आमच्या नेहमींच्याच सर्कलमधला !—आपला दोस्तच म्हणा ना ! "

" अय्या, होऽ"—तिनं एकदम किंचित् चमकून विचारलं.

लाल्याला वाटलं, या थोर माणसाची अन् आपली दोस्ती आहे असं तिला कळल्यामुळं आपण केवढ्या मोठ्या व्यक्तीशीं बोलत आहों, असंच तिला वाटलं असावं अन् म्हणून तिनं तो विस्मयोद्गार काढला असावा अन् मग अधिक उत्साहानं तो म्हणाला,

" हो तर !—नानाचं माझ्या सल्ल्याखेरीज पानच हालत नाहीं म्हणा ना ! इतकं त्याचं माझं रहस्य आहे ! "

" अग बाईऽ खरंऽऽ ! " असा चकित स्वरांत तिनं पुन्हा उद्गार काढला.

लाल्या यावर आणखी कांहीं तरी बोलणार होता; पण तितक्यांतच



८

गाडी थांबवून उभी राहिली अन् गर्दीचा जो लोंढा गाडींत लोटला, त्यामुळं ते दोन प्रेमी जीव ' यथा काष्ठं काष्ठंच ' यांत म्हटल्याप्रमाणं विलग होऊन गेले. न् मग लाल्यानं तिचा शोध केला तरी ती कांहीं दिसली नाहीं-आणि मग लाल्याला आठवण झाली, कीं-सगळंच मुसळ केरांत !—त्या साऱ्या गडबडींत आपण तिचं नांव विचारून घ्यायला अजिबात विसरूनच गेलों कीं !

" लाल्याला या गोष्टीची फार चुटपूट लागून राहिली. आपलं चित्त जिनं हरण केलं, अन् जिचं चित्त आपण चोरून नेलं, अशा त्या कमल-नयनेचा शोध आपल्याला आतां कसा लागणार याच एका विचारांत तो गुंग झाला. गोविंदरावांनीं त्याच्यासाठीं योजून ठेवलेल्या स्थळाकडे ढुंकूनही पाहायचं त्यानं नाकारलं. पण बापानं खडसावून सांगतांच तो ती पोरगी पाहायला तयार झाला; मात्र जातांना ती पोरगी नाकारायचीच अशी मनाशीं आगाऊ खूणगांठ बांधायला तो विसरला नव्हता !—

" अन् मग अचानकच ती आगगाडींतील कमलनयना त्याच्या दृष्टीला पडली ! अन् ती अशा ठिकाणीं, कीं लाल्याला आपण स्वप्नांत तर नाहीं ना असंच-कांहीं क्षण वाटलं. लाल्या आपल्या भावी श्वशुरांच्या ( पण जे त्याचे श्वशुर झालेच नाहींत ) दिवाणखान्यांत त्यांची मुलगी पाहण्यासाठीं म्हणून खिन्न मनानं न् खिन्न वदनानं जाऊन बसला होता,—त्याच्या खिन्न वदनाचं कारण मंडळींच्या लक्षांत आलंच असेल !— आगगाडींतील ती कमलनयना या वेळीं कुठं असेल हाच एक विचार त्याच्या डोक्यांत त्या वेळीं घोळत होता. अन् मग ज्या वेळीं त्या तिथंच तीच ती हरि-णाक्षी त्याच्यासमोर हातांत फराळाचं ताट घेऊन उभी ठाकलेली त्याला दिसली, त्या वेळीं आश्चर्याच्या प्रचंड धक्क्यानं तो हादरूनच गेला !

" पण त्यापेक्षांही मोठा धक्का नंतरच्या क्षणीं त्याला बसला ! ' अग बाई ! ' असा भयचकित अस्फुटोद्गार काढून ती पोरगी हातांतलं ताट तसंच तिथं टाकून जी आंत धांवत गेली, ती बाहेर यायलाच कबूल होईना ! आंत कांहीं तरी गोंधळ, गडबड चालल्याचं लाल्याला ऐकूं आलं. सुमारें

पंधरावीस मिनिटं अशींच गोंधळांत गेल्यावर लाल्याचे पूर्वोक्त श्वशुर बाहेर आले न् गंभीर स्वरांत गोविंदरावांना म्हणाले,

" माफ करा हं; हें कांहीं जमणं शक्य वाटत नाहीं मला ! "

" कां ? कां ? " गोविंदरावांच्या उत्तराची वाट न पाहतां लाल्यानं मध्येंच गडबडीनं विचारलं.

" आमची मुलगी अर्धा डझन कांदे हुंगवले, त्या वेळीं नुक्ती कुठं शुद्धीवर आली ! तिला एवढा धक्का कां बसला यांना पाहतांच, हें मीं तिच्याकडून काढून घेतलं ! नाना गटण्यासारख्या गाजलेल्या बदमाषाच्या दोस्ताला मुलगी देण्यापेक्षां तिला गंगेंत लोटून दिलेलं मला अधिक पुरवेल ! " –

" अस्सं ! म्हणजे लाल्यानं दोस्तीचं नातं जोडलेला हा गटणे बद-माष होता होय ?—" शिदूनानांनीं मध्येंच विचारलं.

" होय ना ! त्याचा उद्योग हा असाच ! नाना नांवं धारण करायचीं अन् मुलींच्या बापांना भूल पाडून लग्न लावीत सुटायचं ! "

" मग त्या पोरीनं या त्याच्या दोस्ताचा शॉक घेतला यांत कांहीं नवल नाहीं म्हणा ! " केसुकाका उद्गारले.

" अन् मग शेवटीं ? "—उत्सुकतेनं सोन्याबापूनं विचारणा केली.

" शेवटीं काय, गोविंदरावांच्या खंडीभर शिव्या खाऊन लाल्या दुस-ऱ्याच दिवशीं मॅाग्रेलसाहेबाच्या सेवेला हजर झाला ! "—जगूअण्णांनीं विडी-काडीची गांठ घालीत म्हटलं.

---